






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.






अनुक्रमणिका

# विविधज्ञानविस्तार

वर्ष ६४ वें | आगस्ट १९३३ | अंक ८ वा

## श्रीधराचा जैमिनि अश्वमेध

[ लेखकः—प्रो. चिंतामण नीळकंठ जोशी, एम्. ए. ]

### लेखांक १ ला

समग्रं भारतं तेन श्रुतं भवति भारत । यश्चाश्वमेधिकं सर्वं शृणुयाद् भावपूर्वकम् ॥

जै. अश्व. अ. ६८-१०,११

**प्रास्ताविक**

ज्ञानदेवापासून तों मोरो तापर्यंतचें सर्व जुनें मराठी वाङ्मय परमार्थपर व पौराणिक आहे. म्हणूनच तें एकांगी, एकतारी, व वैचित्र्यविहीन आहे अशा आधुनिक चिकित्सकांच्या आक्षेपांचा तें विषय होऊन बसलें आहे. तरी पण त्याची गोडी व आवड अजूनही कांहीं धर्मप्रवण व पुराणवाङ्मयप्रेमी वाचकांस आहे. वारकरीपंथीयांस तर "ज्ञानेश्वरी" मातृदैवताप्रमाणें पूज्य असून ते तिला "आई" असें संबोधितात. हरिपाठाचे अभंग, नामदेव-तुकारामांचे अभंग, यांस तर त्यांच्या नित्यपाठांत कायमचें स्थान मिळालें आहे. पण त्याबाहेर त्यांची आवड कमीच आहे, हें कबूल केलें पाहिजे. पुनः ज्ञानेश्वरीसारख्या अत्यंत श्रेष्ठ, गहन व काव्यमय ग्रंथाचा आस्वाद घेण्याची ऐपत व रसज्ञता थोडक्यांच्याच अंगीं असणार. म्हणून तिचे वाचकही थोडेच विद्वान् सांपडणार. पण श्रीधराच्या ग्रंथांची गोष्ट मात्र फार वेगळी आहे. महाराष्ट्रावर त्याच्या रसाळ ग्रंथांची छाप कांहीं वेगळीच आहे. हरिविजय, रामविजय, व पांडवप्रताप इत्यादि त्याच्या ग्रंथांस मोरोपंताच्या[1] काळापासून तों आजतागायत जी मान्यता व लोकप्रियता लाभली आहे, तितकी कोण त्याही मराठी ग्रंथास लाभली नाहीं. महाराष्ट्रां असंख्य साक्षर स्त्रीपुरुषांच्या व आबालवृद्धांच्या प्रेमा-याचा श्रीधर आहे. चातुर्मासांत तर खेड्यापाड्यांत-सुद्धा आपल्या शेतीभातीचें कामकाज करून थकून भागून आलेला साक्षर शेतकरी रात्रीं घटका दोन घटका श्रीधराचे ग्रंथ वाचून आपला दिवसभर झालेला शीण विसरतो, व आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांसही आपल्याबरोबर परमार्थाचा लाभ करून देतो. "पांडवांच्या वंशवनीं । कां दावाग्नि लाविसी ॥" अशा ओंव्या आपल्या गांवढळ सुरांत व उच्चारांत वाचणारा एखा कुणबी व आपल्या गांवढळ भाषेत त्या समजावून स

१. हरिविजय ग्रंथातें आधीं मग श्रीधरास वंदीन ॥ —मोरोपंत, सन्मणिमाला ३१




अनुक्रमणिका

णारा दुसरा अर्थकार व तो श्रवण करून माना डोलविणारे अनेक श्रोते, असा देखावा अजूनही पुष्कळ खेड्यांतून दृष्टीस पडतो. श्रावण महिन्यांत तर सोमवारीं शिवालयांत "शिवलीलामृता"चें पारायण करणाऱ्या चातुर्वर्णिकांचे थवेच्या थवे दृष्टीस पडतात. आणि त्यांतला "कुक्कुट-मर्कटाचा" अकरावा अध्याय रोज म्हटल्याशिवाय अन्नग्रहण न करणाऱ्या आमच्या भाविक भगिनी अद्यापिही पुष्कळ आढळतात. अशा लोकप्रिय श्रीधराच्या "जैमिनि अश्वमेधाचा" अल्प परिचय आज वाचकांस करून द्यावयाचा आहे. हरिविजयांत गोपीप्रेम व कृष्णलीला यांच्या सुरस वर्णनांत भक्तिरस भरला आहे. पांडवप्रताप नवरसांनीं आकर्षक झाला आहे. धीरोदात्तनायकवर्णनानें रामविजय गंभीर व प्रौढ झाला आहे. शिवलीलामृत ग्रंथ भक्ति, श्रद्धा, व उपासना यांचा वर्धक झाला आहे, तर जैमिनि अश्वमेध नानाप्रकारच्या रसांनीं व चमत्कारिक कथांनीं चित्ताकर्षक झाला आहे. श्रीधराच्या इतर ग्रंथांपेक्षां तो जरी कमी लोकप्रिय व प्रसिद्ध असला, तरी योग्यतेंत तो कोणत्याही दृष्टीनें कमी नाहीं. असो. आतां आपण अश्वमेध म्हणजे काय व त्या यज्ञसंस्थेचा इतिहास काय आहे हें पाहूं.

**अश्वमेध व त्याचा इतिहास**

( २ ) अश्वमेध या नांवाचा एक संवत्सरपर्यंत चालणारा एक यज्ञ आहे. हा बहुधा सार्वभौम राजानें करावयाचा असतो. शास्त्रोक्त लक्षणांनीं युक्त असा अश्व संरक्षकांसह एक वर्षभर सोडावयाचा, व तो परत आल्यावर त्याचें यथाविधि हवन करावयाचें. ब्रह्महत्यापातकनाशार्थ व क्वचित् पुत्रप्राप्त्यर्थ हा केला जात असे. ही यज्ञसंस्था फार पुरातन आहे. ऋग्वेदांत[२] अश्वमेधांत सोडावयाच्या घोड्याचें वर्णन आलें आहे. तैत्तिरिय[३] संहितेंत व ऐतरेय[४] ब्राह्मणांत याचा उल्लेख आढळतो. त्यांत सुमारें आठ-नऊ राजांनीं हा यज्ञ करून पृथ्वी जिंकिल्याचें वर्णन केलें आहे. याचा प्रयोगविधि यजुर्वेदाच्या सूत्रांत[५] आला आहे. महाभारतांतील अश्वमेधिक पर्वांतील, व वाल्मिकी रामायणांतील दशरथानें पुत्रप्राप्त्यर्थ केलेले अश्वमेधांतील विधि सूत्रोक्त श्रौत धर्माशीं जुळणारे असे आहेत. परंतु जैमिनिवर्णित कांहीं विधि तसे जुळणारे नाहींत. उ. ( १ ) धर्म आधींच दीक्षित होतो. ( श्रीधर अ. १४,५१ ) (२) ६४ जोडप्यांनीं आणलेल्या तीर्थोदकानें अश्वाला मंगल स्नान घातलें जातें;(३) यूपबद्ध अश्वास तरवारीनें मारलें जातें; (४) अश्वशरीरांतून निघालेल्या ( मांसाऐवजीं) कापराचें हवन केलें जातें. या गोष्टी श्रौत धर्माशीं विसंगत दिसतात. श्रीधरानें आपला ग्रंथ जैमिनीवरूनच लिहिला असल्यामुळें त्यांतही साहजिकपणें या सर्व गोष्टी सांगितल्या आहेत; तेव्हां या विसंगतीकडे श्रीधराचें लक्ष गेलें नाहींसें वाटतें.

**जैमिनि कोण ?**

( ३ ) जैमिनि हा एक महर्षि व्यासांचा शिष्य होता. अशी एक दंतकथा प्रचलित आहे कीं, त्यानें आपल्या गुरूप्रमाणें संपूर्ण भारत तयार केलें होतें. परंतु गुरूच्या शापामुळें तें नष्ट झालें. पण त्यांतील "अश्वमेधपर्व" फारच उत्कृष्ट झालें असल्यामुळें तें व्यासांसही आवडलें. म्हणून त्यांनीं तेवढें मात्र रक्षिलें. त्यांतील मनोरंजक उपकथा आबालवृद्धांस प्रिय झाल्या आहेत.

**मराठी अश्वमेध[६]**

( ४ ) विष्णुदासनामा, नरहरि, मालुनाथ, मुद्गल, गोपाळ, शुभानंत, मुक्तेश्वर, वगैरे अनेक कवींनीं जशी भारतीय कथांवर मराठींत काव्यरचना केली आहे, तशी अश्वमेधावरही नामापाठक, कृष्णदास, दासोसुत मुद्गल, नारायण विप्र,

---

२. ऋ. वे. १. १६२.
३. तै. सं. ५.४,१२.
४. ऐ. ब्रा. ८. २१,२३.

५. सत्याषाढसूत्रें. [ म. ज्ञा. कोशावरून, पृष्ठ ६०९-१० ]
६. महाराष्ट्र सारस्वत-भावे.



जगजीवन, विष्णुदास, माधवस्वामी, विठ्ठलस्वामी व शिवकल्याण यांचीही रचना आहे; परंतु श्रीधराच्या ग्रंथाइतका कोणाचाही ग्रंथ रसाळ नसल्यामुळें त्यांस त्याच्याइतकी प्रसिद्धि मिळाली नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांपैकीं बहुतेक स्मृतिशेष झाले आहेत. सामान्य वाचकांस तर त्यांची ओळखही नाहीं.

**श्रीधराच्या जैमिनि अश्वमेधाचा काल**

(५) कवींचें इतिवृत्त व काल ह्या गोष्टी संस्कृत वाङ्मयास अगदींच पारख्या आहेत. कालिदासाचा काल-निर्णय अद्यापि विद्वानांचा कल्पनाविषयच असून तत्संबंधीं तर्क चालूच आहेत. तितकी अडचण जरी मराठी कवींसंबंधीं सुदैवानें नाहीं, तरी मुकुंदराज, वामन पंडित यांसारख्या अनेक थोर कवींच्या जीवनवृत्तांताचा व कालाचा शोध संशोधकांस अजून निश्चयानें लागलेला नाहीं. कवींची तटस्थता व समकालीनांचें औदासीन्य यामुळेंच अशा अडचणी प्राप्त झाल्या आहेत. या बाबतींत श्रीधरानें मात्र थोडीशी खबरदारी घेतली असल्यामुळें त्याच्या ग्रंथाचे काल व लेखनस्थळें हीं निश्चयानें त्याच्या त्या त्या ग्रंथावरून सांगतां येतात. त्यानें ग्रंथलेखनास सुरवात केल्यावर हरिविजय शके १६२४ मार्गशीर्ष शु. द्वितीयेस संपविला. त्यानंतर शके १६२५ त रामविजय व शके १६३४ त पांडवप्रताप लिहिला. शके १६३७ त अश्वमेध व १६४० शिवलीलामृत ग्रंथ त्यानें लिहिले. प्रस्तुत ग्रंथाविषयीं तो अखेरीस लिहितोः—

शके सोळाशें सततीस । दुर्मुखनाम संवत्सरास ।
ग्रंथ समाप्त केला पाथरीस । पंढरीनाथें दयाळें ॥
अ. ६६–९८ ॥ शाहाण्णव अध्यायीं करविला ग्रंथ ।
त्याचा भोक्ता पंढरीनाथ । पौष मास शुक्लपक्षांत ।
सप्तमीतिथी सोमवारीं ॥ ९९

पाथरी हें गांव मोंगलाईंत परभणीजवळ आहे. श्रीधराचे इतर ग्रंथ पंढरपुरास लिहिले गेले. हाच ग्रंथ पाथरीस लिहिण्याचें प्रयोजन काय झालें असावें व त्या गांवाशीं त्याचा काय संबंध होता, वगैरे गोष्टी कळण्यास कांहीं मार्ग नाहीं. एक तपाच्या व्यासंगानें परिणतप्रज्ञ झाल्यावर हा सुंदर ग्रंथ त्यानें लिहिला, हें मात्र अगदीं स्पष्ट दिसत आहे.

**एक शंका.**

(६) प्रो. श्रीधर विष्णु परांजपे यांनीं मोरोपंत केकावली, भाग २, यांत "हा ग्रन्थ याचे नांवें मोडतो, परंतु अंतःस्थ प्रमाणांवरून तो त्याच्या कोणी तरी शिष्यानें केलेला असावा, असें वाटतें," अशी श्रीधराच्या अश्वमेध ग्रंथासंबंधीं शंका प्रदर्शित केली आहे; पण त्यांनीं तीं प्रमाणें दिलीं नसल्यामुळें व श्रीधरानें केलेला आपल्या मातापितरांचा व आनंदसांप्रदायांतील आपल्या गुरुपरंपरेचा उल्लेख स्पष्ट केला असल्यामुळें व इतर पुरावाही बळकट असल्यामुळें ही शंका विचारार्हच नाहीं असें म्हणून आम्ही ती सोडून देतों.

**ग्रंथाधार**

(७) ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरींत "भाष्यकारातें वाट पुसत" व "झाडा देईन प्रतिपदीं ग्रंथार्थेसी" अशी ग्वाही आपल्या श्रोत्यांस दिली आहे, तशीच श्रीधरानेंही दिली आहे. तो म्हणतोः—"नारायणावतार व्यासमुनी । तयाचा मुख्य शिष्य जो जैमिनी ॥ तेणें अश्वमेध कृतकथा । ती महाराष्ट्र भाषेंत वर्णीन आतां । मूळ पदीं ठेऊनि चित्ता । सांगेन श्रोतया यथामति ॥ १–२५ ॥" तेव्हां ज्ञानेश्वराप्रमाणें तोही आपल्या प्रतिज्ञेंतून उत्तम तऱ्हेनें उत्तीर्ण झाला असेल असेंच कोणासही वाटेल; पण ज्याप्रमाणें ज्ञानेश्वरानें या प्रतिज्ञेपलीकडे जाऊन आणखीही किती तरी विविध ज्ञान मोठ्या मनोरंजकतेनें आपल्या वाचकांपुढें सादर केलें आहे, तसेंच श्रीधरानेंही केलें आहे. उदारचरित थोर व्यक्तींचा अंगीकृत कार्यासंबंधींचा क्रम असाच असतो. मारुतिरायानें सीताशुद्धि करून स्वपराक्रम गाजविला. अंगदानें शिष्टाईंत सांग-

७. म. सारस्वत, पान २३२; आवृत्ति स. १९२५




अनुक्रमणिका

काम्यापेक्षां अधिक कामगिरी बजावली. उत्तम वक्ता निरनिराळ्या ठिकाणची माहिती संकलित करून आपला विषय परिपूर्ण व चित्तवेधक करतो. तसेंच श्रीधरानेंही केलें आहे. मूळ ग्रंथ पुढें ठेवून व मूळ पदांकडे लक्ष देऊनच त्यानें ही कथा मराठींत आणिली आहे. मुळांत अ. ६८ असून त्यांतील श्लोकसंख्या ५१६९ आहे. पण श्रीधराच्या ग्रंथाचे अ. ९६ झाले असून ओवीसंख्या ९८७६ झाली आहे. श्रीधराचे अध्याय वाढण्याचें कारण असें कीं, आरंभापासून ६० अध्यायापर्यंत मुळावरहूकूम ग्रंथ लिहिल्यावर आपल्या श्रोत्यांस याच विषयावरील पुराणांतरींच्या कथा सांगून रंजवावें असें त्याच्या मनांत आलें व त्यानें आपली दृष्टि इतर पुराणांकडे वळविली. दुसरें कारण असें कीं, "संकृत अमृतोदककूपपरम। तेथें गुणपात्र नसतां उत्तम। पांथिक तृषार्तांचा श्रम। सर्वथा न जाय कूपदृष्टीं॥" हें मनांत आणून त्यानें संस्कृतानभिज्ञ वाचकांसाठीं सर्व माहिती एकत्र आणून ठेविली आहे. म्हणून "ही तों भविष्यपुराणींची कथा" असें सांगून दुंदुभि-आख्यानास त्यानें सुरवात केली आहे. त्यानंतर एकापुढें एक अग्निपुराणांतील सैन्यपाळाचें, पद्मपुराणांतील सिंहध्वजाचें, शक्तिपुराणांतील बाणासुराचें, स्कंदपुराणांतील सुग्रीवसुताचें, ब्रह्मांडपुराणांतील चंद्रमौळीचें अशीं एकंदर सहा आख्यानें त्यानें घेतलीं आहेत. यांवर त्याचे २८ अध्याय झाले असून त्यांत २९४६ ओंव्या आल्या आहेत. या अतिक्रमणाबद्दल श्रीधरानें श्रोत्यांची मागितलेली क्षमा ज्ञानेश्वरी थाटाची व मोठी हृद्य आहे. तो म्हणतो :—"तें व्यास वाक्य रसाळ। बोलिला सकळ पुराणीं॥ ९६–७४॥ तुम्ही कृपाळू कीं संत। दोष न ठेवावा याकरितां॥ ७५॥" आणखी मोठ्या चतुरस्रतेनें तो त्यांस बजावतो कीं, यांत मीं आपलीच सेवा केली आहे.कां कीं, "अनेक पुष्पांचा रससार। जैसा घेतो मधुकर। तैसा सर्व पुराणोद्धार। काढोनि कथा कथिली म्यां॥ अ. ८८,८०॥ दुंदुभीपासोनि हिमालयापर्यंत। जें म्यां चरित्र वर्णिलें येथ। हें व्यासकृत पुराणोक्त। मम कृत्य नव्हे कीं॥ म्हणोनि त्या ग्रंथाहूनि भिन्न। म्यां हें केलें वर्णन। सद्भावें कर जोडून। श्रीधर विनवी श्रोतयां॥८२॥" या प्रार्थनेनें दुराराध्य चिकित्सकही निःसंशय निवेल. पण ही पद्धति श्रीधरानें नव्यानेंच ह्या ग्रंथापुरती स्वीकारिली नसून तिचा अवलंब त्यानें आरंभापासूनच केलेला दिसतो. कारण तो आपल्या पहिल्या हरिविजय ग्रंथांत म्हणतोः—"(भागवत) दशम आणि हरिवंश। अनेक पुराणींच्या कथा विशेष। बोलले कवि महापुरुष।—तितुकियांचा जो मथितार्थ। तो हरिविजय ग्रंथ। दुजा नाहीं विपरीतार्थ। सत्य सत्य त्रिवाचा॥१–११४॥ हरिवंश भागवतीं पाहीं। महाबळ विप्राची कथा नाहीं। शोध करितां सर्वा ठायीं। नारदपुराणीं देखिली॥ ४–१२०॥ तेथें ही कथा लिहिली जाण। श्रोतीं न धरावा अनमान। मुळावेगळी कथा पूर्ण। सहसाही वाढेना॥ नाना पुराणींचे इतिहास। बोलिला स्वामी वेदव्यास। यालागीं कदापि दोष। न ठेवावा ग्रंथातें॥ अ. ४.१२२॥" असो. तेव्हां हे वाढलेले अ. २८ व त्यांतील २९४६ ओंव्या एकंदर ग्रंथांतून वजा जातां, मूळ ६८ अध्यायांस मराठी ६८[१०] अध्याय होऊन, ५१६९ संस्कृत श्लोकांवर ६९३० ओंव्या झाल्या आहेत असें स्पष्ट होतें. हें प्रमाण संवाईहून थोडेंसें जास्त आहे व तें गैरवाजवी आहे असें कोणी म्हणणार नाहीं. एकंदरींत आपल्या बहुश्रुतपणानें श्रोत्यांस बहुश्रुत करावें व औचित्यभंग न करितां त्यांस रंजवावें हेंच ध्येय श्रीधरानें आपल्यापुढें ठेविलें होतें असें दिसतें.

---

८. "नामूलं लिख्यते किंचित्"

९. दोन्ही उताऱ्यांतील साम्यावरून दोन्ही ग्रंथ श्रीधराचेच आहेत, हेंही सहज पटण्यासारखें आहे.

१०. मुळांतल्या अध्याय ३८ बरोबर मराठी ३८ अध्याय होऊन ३९ तही ३८ च्याचा थोडा भाग आला असल्यामुळें मराठी अध्याय एक एक वाढला आहे व ६० त ५९ वा आला आहे. पुढें ८९ ते ९६ मध्यें ६० ते ६८ आले आहेत.



**कथासार**

(८) परिक्षितिनंदन जनमेजय यानें विचारल्यावरून जैमिनीनें ही कथा सांगितली आहे. गोत्रजवधानें धर्मराज अगदीं विषण्ण झाला; व "आतां राज्य करो भीमसेन । मी करीन तीर्थाटन ।।" असें म्हणून राज्यत्याग करून जावयास निघाला. एवढ्यांत त्यास व्यासांनीं दर्शन देऊन सांगितलें कीं, अश्वमेध कर, म्हणजे तुझ्या सर्व पातकांचा क्षय होऊन तुला मनःशांति मिळेल. त्याप्रमाणें त्यानें तो आरंभिला. यौवानाश्वाकडून अश्व हरण करून आणल्यावर यज्ञाची तयारी झाली. यज्ञदर्शनार्थ भीमानें श्रीकृष्णास सहकुटुंब सहपरिवार बोलावून आणलें होतें. त्यांच्या स्वागताच्या गडबडींत अनुशाल्वानें अश्वहरण केलें. तो वृषकेतूनें सोडवून आणल्यावर अर्जुनास संरक्षक नेमून अश्वास विधिपूर्वक सोडलें. पुढें त्यास माहिष्मतीच्या नीलध्वज राजानें पकडलें. त्यापासून तो घेऊन तुरगरक्षक पुढें गेले. तेव्हां एका शिळेला तो अश्व चिकटला. सौभरि ऋषींच्या कृपेनें तो सुटल्यावर हंसध्वजाच्या राज्यांत धरला गेला. कृष्णानें सुधन्व्याचा व सुरथाचा वध करून घोडा मिळविला. सुधन्व्याचें एकपत्नीव्रत व हरिभक्ति हीं फारच मनोवेधक रीतीनें वर्णिलीं आहेत. पुढें प्रमिलेशीं विवाह करून स्त्रीराज्यांतून गेलेला अश्व अर्जुनानें मिळविला. त्यानंतर अर्जुन व बभ्रुवाहन या पितापुत्रांचा दारुण संग्राम फार लोमहर्षण झाला आहे. या वेळीं पुनः श्रीकृष्णकृपेनें अर्जुन जिवंत झाला. मध्यंतरी कुशलवोपाख्यान आलें आहे. पुढें ताम्रध्वज व मयूरध्वज यांशीं कपटयुक्ति करून कृष्णार्जुनांनीं घोडा मिळविला. त्यानंतर वीरवर्म्यानें युद्धांत अर्जुनास हतबल करून सोडिलें आणि मग घोडा दिला. तदनंतर चंद्रहासोपाख्यान आलें आहे. चंद्रहासानें कृष्णभक्तीमुळें पांडवांबरोबर युद्ध केलें नाहीं. उलट त्यांच्याबरोबर अश्वरक्षणास आपण निघाला. पुढें बकदाल्भ्यमुनींची भेट व दुःशीलासांत्वन हीं प्रकरणें आलीं आहेत. इतकें झाल्यानंतर एक वर्षभर पृथ्वीभ्रमण करून घोडा परत हस्तिनापुरीं आला. त्यानंतर यज्ञाला सुरवात झाली. जलाभरण, अश्ववध, त्याचें हवन, अवभृथस्नान, पुरोडाशभक्षण वगैरे विधि होऊन यज्ञसमाप्ति झाली. पुढें भोजनप्रसंग, नकुलाख्यान व धर्मगर्वहरण आणि नकुळपूर्वकथाकथन या गोष्टींचें वर्णन करून श्रीधरानें ग्रंथ संपविला[11] आहे. एकंदर कथेंत एक मुख्य गोष्ट जी दिसून येते ती ही कीं, पांडवांच्या पराक्रमापेक्षां त्यांच्या शत्रूंचेंच शौर्य व कृष्णभक्ति हीं अधिक दिसून येतात व त्याबद्दल त्यांचेंच कौतुक करावेंसें वाटतें. प्रत्येक वेळीं श्रीकृष्णाच्या साहाय्यानें व युक्तीनेंच पांडवांस यश मिळालें आहे. असो.

**श्रीधराचा हा ग्रंथ निवळ भाषांतर आहे काय ?**

(९) जुनी मराठी कविता म्हणजे संस्कृताची छाया. संतकाव्य भिकार व उष्टें, म्हणून टाकाऊ : त्यांत स्वतंत्र प्रतिभेचा विलास नाहीं व म्हणूनच त्यांत हृदयंगमत्व नाहीं, असे आक्षेप पाश्चात्य वाङ्मयविशारदांकडून नेहमीं घेतले जातात. त्यांत थोडासा जरी तथ्यांश असला तरी या दूषांकडून या बाबतींत पुष्कळसा अविवेक व अतिरेक होतो हेंही तितकेंच खरें आहे. मोरोपंतांच्या कवितेसंबंधीं असा वाद बराच माजला होता. परंतु काव्यसंग्रहांत विद्वान् संपादकांनीं मोरोपंती भारताची मुळाशीं तुलना करून जें सत्य पुढें आणिलें, त्यानें वरील भ्रमाचा बराचसा निरास झाला आहे. ह. भ. प. पांगारकर वगैरे विद्वानांनींही या बाबतींत बरीच चांगली कामगिरी केली आहे. मोरोपंतांचें आर्याभारत भाषांतर नव्हे. तर पंतांनीं सामान्यतः पांडवकथा आर्येच्या पूर्वार्धांत गोंवून उत्तरार्धांत अर्थांतरन्यास, सुभाषितें, लौकिकोक्ति, व इतर सुंदर शब्दार्थालंकार योजून जागजागीं त्यांस मंडित केलें आहे व यांत दिसून येणारें त्यांचें कल्पनाचातुर्य, बहुश्रुतता व बुद्धिमत्ता यांच्या योगें करून त्यांच्या ग्रंथास स्वतंत्र रचनेचा मान आज विद्वानांत

११. अवांतर २८ अध्यायांतील कथाभाग पूर्वीं सांगितला असल्यामुळें येथें पुनरुक्ति केली नाहीं.





अनुक्रमणिका

मिळूं लागला आहे. भर्तृहरिच्या शतकत्रयाचें वामन पंडिताचें रूपांतर हें निवळ भाषांतर होय. तसें त्याची समश्लोकी हेंही भाषांतर आहे. पण आर्याभारत जसें निवळ भाषांतर नव्हे, तसेच श्रीधराचे ग्रंथही निवळ भाषांतररूप नाहींत. मुळांतील कल्पना घेऊन तिला आपल्या बुद्धिचातुर्यानें व प्रतिभाविलासानें मंडित करून व खुलवून वाचकांपुढें मांडण्याची त्यास उत्तम हातोटी साधली आहे. त्यामुळें मूळ कथानक जरी तेंच असलें तरी त्यास नवीन रुचि येते. त्यास नवीन स्वरूप प्राप्त होऊन त्याचा मोहकपणा वाढतो. आतां प्रस्तुत ग्रंथांत हें कार्य श्रीधरानें कसें साधलें आहे हें थोडक्यांत पाहूं या.

**ग्रंथ प्रारंभ व शेवट**

१. श्रीधराचे ग्रंथाचे आरंभ व शेवट हे अगदीं स्वतंत्र आहेत. प्रारंभींचें मंगलाचरण गणपति सरस्वती, कुलदेवता व गुरु यांस केलेलें नमन स्वतःचें आहे. यांत योजलेलीं रूपकें खरोखर उत्कृष्ट आहेत. त्यानंतर "श्रोतें व्हावें सावधान" असें म्हणून त्यांच्यासंबंधीं एकावर एक योजलेले दृष्टांत फारच मनोहर असून ते ज्ञानेश्वरी थाटाचे झाले आहेत, एवढें त्यासंबंधीं सांगितलें म्हणजे पुरे आहे. त्याचप्रमाणें अध्याय व ग्रंथ यांचे समाप्तीचे वेळीं प्रकट केलेल्या त्याच्या कल्पना सुंदर व स्वतंत्र आहेत. संस्कृत प्राकृतासंबंधींचे त्याचे विचार मोठे कौतुकावह असून व्याह्याचा दृष्टांत मोठा खुमारीचा आहे.

**मुळांत जागोजाग भर**

२. पहिलाच अध्याय पाहिला, तर मुळांत ज्या कल्पना नाहींत, अशा सुंदर कल्पना जनमेजय-जैमिनी संवादांत, व्यासवर्णनांत, व्यासोपदेशांतील वेदांतांत आल्या आहेत. "तों गोत्रजवधाची चिंता अंतरीं। सर्पिणीरूपें प्रसवली ॥" ही एकच स्वतंत्र कल्पना आम्ही नमुन्याकरितां येथें देतों. अशा वैचित्र्यानें सर्व ग्रंथ भरला आहे. तेव्हां तो केवळ भाषांतरित असें कसें म्हणावें? पुढें आठवा अध्याय घेतला तर त्यांतही अशीच भर दिसून येते. मुळांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचीं कर्में अगदीं संक्षिप्त आहेत, तीं श्रीधरानें स्वतःच्या शास्त्रज्ञानानें पूर्णतेनें दिलीं आहेत. तसेंच विधवेच्या धर्मांत मुळाहून अधिक असे पुढील धर्म सांगितले आहेत :— तिनें वपन करावें व वलयकंचुकीधारण, तांबूलभक्षण, द्विवार भोजन वगैरे गोष्टी वर्ज कराव्या. मुळांतील श्लोकावरील पुढील टीका कवीची स्वतंत्रता व बहुश्रुतता व्यक्त करिते—
"असत्यकोऽथ पिशुनो नास्तिको धूर्तको नरः। समीपे संस्थितो राज्ञां प्रजानां दुर्लभं सुखं ॥ श्लो. ३२ ॥"
यावर अधिक टीका:—"भुजंगमुखीं काळकूट असे। तेंचि वृश्चिकपुच्छीं वसे। खळ जनांचे सर्वांगीं असतसे। म्हणूनी सर्वथा दवडावें ॥ ८.६३ ॥ खळसर्पाचा वध विपरीत" इ. ( "अहो खल भुजंगस्य" इ. )
"परि सर्पविष उतरावया जाण। धन्वंतरी आहे विचक्षण। खळविष हरावया लागुन। वैद्य त्रिभुवनीं असेना ॥" ८.६५॥ अ.९ मध्यें ९ प्रकारच्या वड्यांची कल्पना मुळांत नाहीं. "स्नेह कढईमाजि दिव्य जाहले। अनुतापाग्निनें पचले। मग अनुराग दह्यीस जे आले। ऐसे वटक नवविध ॥" त्याचप्रमाणें भोजनावर केलेलें रूपक फारच अपूर्व आहे, तें मुळांत नाहीं :—
"रत्नखचित ताट स्यंदन। त्यावरी बैसला भूप ओदन। तप्तकनकवर्ण वरान्न (वरण)। शिरीं आतपत्र साजिरें ॥९-४४॥ शाका सेवक पंक्ति शोभत। बरवा प्रधान तें घृत। कथिका वाद्य शोभत। चामरें करपल्लवांचीं ॥ ४५ ॥ ऐशिया परिवारें शृंगारिला। ओदन भूपति तो निघाला। तेणें जठराग्नि संहारिला। घडी न लगतां निजबळें ॥ ४६ ॥" पुढें १७ व्या अध्यायांतील प्रभावतीचें स्वरूपवर्णन कोणत्याही प्रतिभाशाली कवीस शोभेल असेंच आहे. हें वर्णन ७२ ते ८२ ओव्यांत आलें आहे. विस्तारभयास्तव त्यांतील फक्त १-२च कल्पना नमुन्यादाखल देतों:—




अनुक्रमणिका

" पतन भयें शुक्रबिंब । कनक शलाकेचा करोनि अवलंब । मुक्तमिषें नासिकीं राहोनि अधरबिंब । चुंबावया धाविन्नला ॥ ७४ ॥ मुक्तावळी ती भीष्म-माता । उदरीं रोमावली रविसुता । कुंकुमरेखा सरस्वतीसरिता । गुप्त जाणा येथुनी ॥ ७८ ॥ हा देखोनियां प्रयाग । तेथें बैसोनिया अनंग । अनुष्ठान करीतसे सांग । दिव्य अंग पावावया ॥ ७९ ॥" अशीं स्वतंत्र वर्णनें सर्व ग्रंथभर पसरलेलीं आहेत. सर्वांचा निर्देश करणेंही अशक्य असल्यामुळें पुढें कांहींचाच केला आहे. मयूरध्वजनगरीवर्णन मुळांत नाहीं. तें फार सुंदर झालें आहे ( ४५ अ. ). मयूरध्वजकृत पुत्रधिक्कार वर्णन मुळापेक्षां जोरदार वठलें आहे. वाल्मिकीचे सीतेविषयींचे तर्क नावीन्यपूर्ण आहेत ( २९ अ. ). कुश लढण्यास जात असतांना त्यावर केलेल्या उत्प्रेक्षा फार सरस आहेत ( ३० अ. ).

३. उत्प्रेक्षारूपकांप्रमाणेंच इतर अलंकारांनीं, म्हणी-सुभाषितांनीं व भर्तृहरि वगैरेसारख्यांच्या श्लोकांच्या भाषांतरानेंही श्रीधरानें आपल्या ग्रंथाचें सौंदर्य वाढविलें आहे. त्याचीं एक दोन उदाहरणें पुढें देतों:—

(अ) केश पुष्पास जेथें बंधन ।
द्यूत सारीस असे मरण ।
छत्रालागीं असे दंडधारण ।
सुरतीं हारी पुरुषातें ॥ अ. २२–१३५
मुख नव्हे हा रोहिणीधव ।
अश्रु नव्हती अमृतस्राव ॥ अ. ५२–१४
हस्तकंकणाचा भाव ।
दर्पण कासया पाहावा ॥ अ. ७५–४३
कठिण दुःख पाठीचें ।
त्याहूनि दुःख पोटिचें ॥ अ. ७७
जैसें श्वानपुच्छ नलिके घातलें जाण ।
नीट नव्हे कल्पांतीं ॥ अ. ७३–३५
उदंड केलिया प्रयत्न ।
होणार तें न चुकेचि ॥ अ. ७८

पुढील प्रसिद्ध संस्कृत श्लोकांचीं भाषांतरें आलीं आहेत:—

(ब) प्रसह्यमणिमुद्धरेन्मकरवक्त्रदंष्ट्रांकुरात् ।
[ अ. १५–११७ ]
अजानत् दाहार्तिं पतति शलभोदीपदहने ।
[ अ. ५८–९ ]
हस्तिस्थूलतरः स चांकुशवशः ।
[ अ. ३०–४–७ ]
न मूर्खजनसंपर्कः सुरेंद्रभुवनेष्वपि ।
[ अ. ३९–१५७ ]

नांतो गुणेषु न च कीर्तिषु रंध्रदेशो ॥अ. ५१-२६॥ प्रांशुलभ्ये फले चाहं उद्बाहुरिव वामनः ॥अ.७७-४४.

४. स्वभावलेखनांतही श्रीधराचें स्वातंत्र्य व चातुर्य दिसून येतें. उदाहरणार्थ राम, लव, कुश यांच्या स्वभावाचें रेखन व विरोचित संवाद हीं फार मार्मिक झालीं आहेत. [कुशलवोपाख्यान, अ. ३१-३६.]

५. नीतिबोध, व्यवहारज्ञान, गृहस्थधर्म, अतिथिमाहात्म्य वगैरेसंबंधीं जागोजाग विखुरलेले विचार श्रीधराच्या स्वतःच्या बहुश्रुततेचे द्योतक आहेत. [ अ.४० ४२,५२,७१,७३,७७,८३,८९,९५,९६. ]

६. ज्याप्रमाणें श्रीधरानें ग्रंथांत पदरची उत्तम भर घातली आहे, त्याप्रमाणें त्यानें कांहीं स्थळें मुळांतलीं गाळलींही आहेत, व यावरून त्यानें सरसहा भाषांतर केलेलें नाहीं हें उघड होतें. याचा थोडक्यांत निर्देश पुढें केला आहे.

(अ) आशा बलवती भीम काचिदाश्चर्यशृंखला । यया बद्धाः प्रधावंति मुक्तास्तिष्ठंति पंगुवत् ॥ जीर्यंती जीर्यतः केशाः ॥इ.॥ ( अ. ६ श्लोक ५५-५६ )

(ब) बालत्वे रक्षिति पिता...न स्वतंत्रा हि योषितः ॥ (अ. ८–१९।२०)

(क) मुंजभोजवर्णन मुळांत सविस्तर आहे. श्रीधरानें गाळलें आहे. (अ. २९.)

(ड) भीमाच्या मार्गाचें वर्णन, द्वारकावर्णन, भोजनांतील मांसमय पदार्थांचें वर्णन हीं श्रीधरानें गाळलीं आहेत. ( अ. ९. )



(इ) आज्ञाभंगो नरेंद्राणां इ. गाळलें आहे. ( अ. १७. )

(फ) पाताळवर्णन गाळलें आहे. ( अ. ३९. )

असो. हा मुद्दा थोडासा लांबला खरा; तरी पण तो वाचकांस कंटाळवाणा कदाचित् वाटेल, या भीतीनें आम्हीं फारच आवरतें घेतलें आहे. वरील प्रकारचीं आणखीं शेंकडों उदाहरणें वाचकांस दोन्ही ग्रंथ ताडून पाहिल्यास सहज सांपडतील. तरी पण वर जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांवरून श्रीधराचा हा ग्रंथ केवळ भाषांतर नसून त्यांत त्यानें विद्वत्तेची भर घालून व कोठें छाटाछाट करून त्यास पुष्कळ नावीन्य व मनोरमत्व आणिलें आहे ही गोष्ट स्पष्ट होईल, असें वाटतें.

---

# पूर्णत्वाची पायरी*

( वृत्त—पांडव दिंडकी )

कोणत्या जावो दिशेनें जीवनौका आपुली
नेमक्या जाई स्थलीं
मार्ग दावी नेमका तो चित्त-होकायंत्र तें
ईशस्थाना दावितें !
पक्व झालें आम्र जातें कीं गळोनी खालतीं
तीच जीवांची गति
पक्व हो ज्ञानप्रकाशें आणि ज्ञानाच्या जळें
ती अहंवृत्ती गळे
बीज पेरावें तदा हो अंकुराचा उद्भव
वृक्ष हो त्याचा नव !
तेंचि भाजोनी जरी बीं पेरुनिया टाकिलें
तें तसेंची राहिलें.
पोंचला सिद्धीपदातें जीव नाहीं गुंतला
या भवीं-तो बाजुला !

लोह झालें एकदाचें हेम, राही हेम तें
टाकिलें कोठेंहि तें
चित्त झालें शुद्ध ज्याचें ईशभक्तीच्या बळें
काय त्याला बाधलें ?
राहि संसारीं तसा वा वानप्रस्थीं साधु तो
दोष त्या ना बाधतो !
लोहशस्त्राचें परीसाच्यामुळें हो कांचन
शस्त्र कां तें राहि न ?
पालटे तो धर्म त्याचा ना कुणा तें संहरी
रूपरेखा ती जरी !
लागला जो सेवनीं त्या श्रीप्रभूच्या त्यास ती
बाह्यता ना विकृति
पूर्वींची हिंसाप्रवृत्ती जात कीं लोपोनिया
लाभलें पूर्णत्व त्या !

अशोक

* रामकृष्णबोधामृतांतून




अनुक्रमणिका

# विजयनगरच्या दरबारीं गाजलेले अनेक माधव

[ लेखकः—शणै गोंयबाब ]

## लेखांक ३ रा

**तिसरा माधवः—** चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत कांहीं काळ शृंगेरीच्या पीठावर अधिष्ठित असलेला सुप्रसिद्ध विद्यारण्यस्वामी ह्याचें पूर्वाश्रमींचें नांव माधव होतें असें म्हणतात. परंतु ह्याविषयींचा पुरावा मिळात नाहीं. केळदीचा राजा बसवराज ह्यानें १७०९ त लिहिलेल्या शिवतत्त्वरत्नाकर नांवाच्या ग्रंथांत त्याचें नांव शिवधर्मन् असें दिलें आहे. त्याचे समकालीन आंगिरसगोत्री माधवमंत्री व भारद्वाजगोत्री माधवाचार्य ह्यांचें कर्तृत्व व विद्वत्ता त्याच्यावर लादण्यांत येत असल्यामुळें त्याचेंही नांव **माधव** असावें असें वाटतें. नांवाच्या सादृश्यावांचून असा घोटाळा होणें कठीण.

विद्यारण्य हा जाडा संस्कृत पंडित असून त्यानें वेदान्तविषयक बरीच ग्रंथरचना केली आहे असें म्हणतात. शंकराचार्यांच्या मागून वेदान्तावर विद्वत्तापूर्ण चर्चा करणारा विद्यारण्याच्या तोडीचा दुसरा पंडित झाला नाहीं असें सांगतात. पंचदशी, अनुभूतिप्रकाश, विवरणप्रमेयसंग्रह वगैरे त्याचे ग्रंथ विद्वन्मान्य आहेत.

पंचदशींत वेदान्ताचा सारगर्भ आला असून आज सर्व हिंदुस्तानांत हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय झाला आहे. ह्यांतील पहिल्या प्रकरणाच्या आरंभीं विद्यारण्यानें शंकरानंदगुरूला नमन केलें आहे. हा शंकरानंद म्हणजे विद्याशंकर, अर्थात् विद्यातीर्थ होय. पंचदशीचीं एकंदर १५ प्रकरणें असून तीं सर्व एकट्या विद्यारण्यानें रचलीं नाहींत,असेंही मत प्रचलित आहे. पंचदशीचा टीकाकार रामकृष्ण हा आपल्या 'पददीपिके' त सातव्या प्रकरणाच्या आरंभीं म्हणतो कीं 'श्रीभारतीतीर्थगुरूनें तृप्तिदीपाख्यम् प्रकरणाला आरंभ केला[3], ह्यावरून रामकृष्णाच्या मतें पहिलीं सहा प्रकरणें विद्यारण्यानें लिहून बाकीचीं नऊ प्रकरणें भारतीतीर्थानें लिहिलीं असें दिसतें. उलटपक्षीं निश्चलदासस्वामी हा आपल्या 'वृत्तिप्रभाकरां'त म्हणतो कीं, पहिलीं दहा प्रकरणें विद्यारण्यानें लिहून बाकीचीं पांच प्रकरणें भारतीतीर्थानें लिहिलीं.[4] हा ग्रंथ दुसऱ्या हरिहराच्या कारकीर्दींत समाप्त झाला असल्याचा पुरावा मिळतो. पंधराव्या प्रकरणाच्या शेवटीं म्हटलें आहे कीं, 'ह्या ब्रह्मानंदानें **हरिहर** नेहमीं संतुष्ट होवो व त्याच्या आश्रयास असलेल्या शुद्ध अंतःकरणाच्या लोकांचें तो रक्षण करो.'[5] ह्यांत हरिहर म्हणजे परमेश्वर असाही अर्थ करतां येईल. हा शब्द हरिहर राजालाच खरोखर उद्देशून असल्यास, पंचदशींतील शेवटचीं प्रकरणें भारतीतीर्थानें लिहिलीं, हें रामकृष्णाचें व निश्चलदासस्वामीचें म्हणणें टिकत नाहीं. कारण भारतीतीर्थ १३७४ त समाधिस्थ झाला[6] व त्यानंतर

१. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३२७.

२. नमः **श्रीशंकरानंद**गुरुपादांबुजन्मने । सविलासमहामोहग्राहग्रासैककर्मणे । १ । पंचदशी, तत्त्वविवेकप्रकरणम्.

३. तृप्तिदीपाख्यं प्रकरणमारभमाणः श्री**भारतीतीर्थ**गुरुस्तस्य श्रुतिव्याख्यानरूपत्वात् तद्व्याख्येयां श्रुतिमादौ पठति आत्मानं चेदिती ।१। सटीका पंचदशी रामकृष्णाख्यकृतव्याख्यासहिता, जगद्धितेच्छु छापखाना, पुणें १८८५, तृप्तिदीपः प्रकरण ७, पृ. १२५.

४. The पंडित, New Series, Benares 1886, vol. 8, note on page 603- Indian Historical Quarterly, vol. 7, p. 91.

५. प्रीयाद्**हरिहरो**नेन ब्रह्मानंदेन सर्वदा । पायाच्च प्राणिनः सर्वान् स्वाश्रितांश्छुद्धमानसान् ।३५। पंचदशी, विषयानंदप्रकरणम्.

६. Annual Report of the Mysore Arch. Department, for 1916, Bangalore 1917, p. 18.






अनुक्रमणिका

तीन वर्षांनीं म्हणजे १३७७ च्या फेब्रुवारींत दुसऱ्या हरिहराची कारकीर्द सुरू झाली[७].

अनुभूतिप्रकाशांत वीस प्रसिद्ध उपनिषदांवर व्याख्यानें असून विद्यारण्यमुनीनें तीं रचलीं असें म्हटलें आहे व त्यांनीं विद्यातीर्थ संतुष्ट होवो अशी इच्छा दर्शविली आहे.[८]

विवरणप्रमेयसंग्रह हा वेदान्तविषयावरील ग्रंथ असून त्यांत सुरवातीच्या श्लोकांत शंकरानंदाची स्तुति आहे. हा ग्रंथ विद्यातीर्थगुरूच्या पायांवर समर्पण केला आहे.[९]

अशी एक आख्यायिका सांगतात कीं, एकदा विशिष्टाद्वैतवादी अक्षोभ्यतीर्थ व अद्वैतवादी विद्यारण्य ह्यांचा राजदरबारांत द्वैताद्वैतविषयक वाद होऊन अक्षोभ्यतीर्थानें 'तत्त्वमसि' च्या तरवारीनें विद्यारण्याचें मोठें रान तोडून टाकलें.[१०] ह्याच्या उलट अद्वैतवाद्यांचें म्हणणें असें आहे कीं, विद्यारण्यानें अक्षोभ्याला क्षुब्ध केलें.[११] वादाचा निकाल लावण्यास वेदान्ताचार्य नांवाचा रामानुजपंथी पंडित मध्यस्थ होता असें म्हणतात. त्याचा काळ इ. स. १२७० पासून १३७१ चा समजतात. ह्यावरून हा वाद १३७१ सालपूर्वीच झाला असला पाहिजे. चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत रचलेल्या जयतीर्थविजय नांवाच्या ग्रंथांत ह्या वादाचें कांहीं वृत्त आलें आहे.[१२]

गुरुवंशांतील वृत्तांताप्रमाणें दुसऱ्या हरिहराचा अभिषेक विद्यारण्याच्या हातानें झाला. त्यावेळीं त्यानें त्या राजाकडून शृंगेरी मठासाठीं बरीच जहागीर, बिरुदें व सत्कारचिन्हें मिळविलीं. त्यांत पालखी, सिंहासन, रत्नखचित पादुका, छत्र, चामरें, सूर्यपानें, मकरतोरण, जगज्जंपि नांवाची मोठी छत्री, ध्वज, भरदिवसा पेटविण्याच्या मशाली वगैरे राजकीय थाटाचा साज होता. ह्याप्रमाणें शृंगेरीच्या स्वामींचें परमहंसांतून राजहंसांत रूपांतर झालें.[१३] ते 'जगद्गुरु' ही अगडबंब पदवी धारण करून संचारास निघते वेळीं एखाद्या महाराजाप्रमाणें रत्नखचित पालखींत बसून जाऊं लागले, व त्यांच्या मागून दांभिक शास्त्र्यांचा घोळका व हत्ती, घोडे, उंट वगैरे जनावरांचा लवाजमा मिरवूं लागला. स्वामींचा पेशा म्हटला म्हणजे त्यांनीं संन्यासवृत्तीनें राहून ज्ञान संपादन करणें व इतरांस त्याचा फायदा देणें. विजयनगरच्या साम्राज्याचा उदय होण्यापूर्वीं हिंदुस्तानांतील खऱ्या संन्याशांचा जीवनक्रम बहुधा असाच असून ते व त्यांचे मठ पूर्ण अकिंचन स्थितींत असत. खुद्द शृंगेरीच्या मठाला, १३४६ चा जयोत्सव होईपर्यंत, जहागिरीचा

७. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३२३.

८. श्रुतिस्मृतीतिहासानामभिप्रायविदव्ययः । श्रुतिव्याख्यानतस्तुष्याद्विद्यातीर्थमहेश्वरः ।१५३। इति श्रीविद्यारण्यमुनिविरचिते सर्वोपनिषदर्थानुभूतिप्रकाशे नृसिंहोत्तरतापनीयव्याख्याने देवविद्याख्यो नाम विंशोध्यायः । A Descriptive Catalogue of संस्कृत Mss in the Library of the Calcutta संस्कृत College, Calcutta 1899, p. 17.

९. स्वमात्रयानंदयदत्र जन्तून् सर्वात्मभावेन तथा परत्र। यच्छंकरानंदपदं हृदब्जे विभ्राजते तद्यतयो विशंति ।१। यद्विद्यातीर्थगुरवे शुश्रूषाऽन्या न रोचते तस्मात्। अस्त्वेषा भक्तियुता श्रीविद्यातीर्थपादयोः सेवा। विवरणप्रमेयसंग्रहः । श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यपूज्यपाद विद्यारण्यमुनिप्रणीतः । मानवल्ल्युपाख्य तैलंगरामशास्त्रिणा संशोधितः । काशी १८९३, पृ. १, २६६.

१०. असिना तत्त्वमसिना परजीवप्रभेदिना। विद्यारण्यमहारण्यमक्षोभ्यमुनिरच्छिनत् । Ind. Ant., vol. 45. p. 21

११ अक्षोभ्यं क्षोभयामास विद्यारण्यो महामतिः । श्रीरुद्राध्याय, आनंदाश्रमसंस्कृतग्रंथावलिः, पुणें १८८८, प्रस्तावना पृ. ५.

१२. Indian Historical Quarterly, vol. 6, p. 714

१३. Annual Report of the Mysore Arch. Department for 1928, Bangalore 1929, pp. 17, 20.



वीतभर तुकडाही नव्हता, व ह्यामुळें त्यापूर्वी तें धर्मपीठ अस्तित्वांत होतें कीं नाहीं, ह्याची जबरदस्त शंका येते. विद्यारण्याच्या कारकीर्दीपासून संन्याशांना व त्यांच्या मठांना निराळेंच वळण लागलें. शृंगेरीचें अनुकरण करून रामानुज, माध्व व इतर मतांचे अनुयायीही निरनिराळ्या राजांकडून जहागिरी व बिरुदें संपादून आपआपला भपका वाढविण्यांत दंग झाले. कांहीं काळानें त्यांचें मूळचें उंच ध्येय बाजूला राहून धर्मपीठें म्हणजे आळशी व निरुद्योगी लोकांचा चरितार्थ चालविणाऱ्या धर्मशाळा बनल्या व भोळ्या शिष्यवर्गांत भलतींच ग्रामण्यें माजवून त्यांचा निकाल लावणें हें मठाधिपतींचें इतिकर्तव्य झालें. सांप्रतकाळीं बहुतेक शिष्यवर्ग बराच सज्ञान झाल्यामुळें ग्रामण्याची मातब्बरी राहिली नाहीं व त्यामुळें स्वामींचें महत्त्वही संपुष्टांत येत चाललें. ही स्थिति आणखी कांहीं काळ अशीच चालू ठेवून सार्वजनिक पैशांचा विनाकारण अपव्यय होऊं देण्यापेक्षां हिंदु समाजानें एव्हांच जागें होऊन हिंदुस्तानांतील एकंदर मठांतील संपत्तीचा विनियोग दुसऱ्या कोणत्या तरी उपयुक्त कार्यांत करण्याची व्यवस्था केली असतां ठीक होईल.

संशयास्पद आख्यायिका सोडून देऊन, चवदाव्या शतकांतील अस्सल गणलेल्या लिखितांत विद्यारण्याचा उल्लेख खालीं दिल्याप्रमाणें आढळतो.

**पहिला उल्लेखः**—शक १२७७ मन्मथ संवत्सराच्या ( इ. स. १३५५–५६ ) सुमारास विद्यारण्य काशी क्षेत्रांत असून, लवकरच बुक्करायानें शृंगेरीचा स्वामी विद्यातीर्थ ह्याच्या आज्ञेनें, विजयनगरास येण्याविषयीं त्याला एक पत्र लिहिलें व तो आल्यावर त्याला बरोबर घेऊन बुक्कराय स्वतः शृंगेरीस गेला व तेथें त्याच्या मठाची व्यवस्था लावून त्यानें त्याचे शिष्य व इतर आश्रित ह्यांच्या निर्वाहासाठीं जमीन दान दिली, अशी माहिती सांपडते.[१४] मन्मथ संवत्सरांत बुक्कराय शृंगेरीस विद्यातीर्थ स्वामीच्या दर्शनास गेला होता, असें तेथील गणपति-वागीश्वरी देवळाच्या उत्तर बाजूस असलेल्या शिलालेखावरून समजतें[१५] बहुधा त्याच वेळीं विद्यारण्यास काशीहून बोलावून आणण्यासाठीं विद्यातीर्थाची आज्ञा झाली असली पाहिजे. ह्या वेळीं त्याची प्रकृति ठीक नसून आपण फार काळ वांचणार नाहीं असें वाटल्यामुळें विद्यारण्यास शृंगेरीस आणविण्याची व्यवस्था त्यानें केली असावी. शृंगेरीस विद्याशंकर नांवाचें जें प्रसिद्ध देऊळ आहे तें विद्यातीर्थ स्वामीचें स्मारक असून इ. स. १३५६ सालानंतर लवकरच बांधलें गेलें व त्यांतील लिंगाची स्थापना भारतीतीर्थ स्वामीनें केली असें इ.स. १३८० च्या ताम्रपटावरून समजतें.[१६] १३५६ पासून १३६० पर्यंतच्या काळावधींत विद्यातीर्थ समाधिस्थ झाला असावा असें अनुमान मीं केलें असून त्याचें कारणही दिलें आहे.[१७] भारतीतीर्थ व विद्यारण्य हे विद्यातीर्थ स्वामीचे शिष्य असून भारतीतीर्थाचा दर्जा वडीलपणाचा होता. ह्यामुळें विद्याशंकर लिंगाची स्थापना त्याच्या हातानें झाली हें उघड आहे. ह्या समारंभास विद्यारण्य कदाचित् हजर नसावा. जर असता तर समारंभाच्या कार्यांत त्याच्या नांवाचा उल्लेख जरूर आला असता. तो काशीसारख्या दूर अंतरावर असल्यामुळें बुक्करायाचें पत्र गेलें असतांही त्याचें लवकर येणें झालें नसून विद्यातीर्थाचें प्राणोत्क्रमण होऊन भारतीतीर्थानें त्याचें स्मारक केल्यानंतर तो शृंगेरीस पोंचला असावा. शृंगेरी मठाच्या गुरुपरंपरेंत विद्यातीर्थ व भारतीतीर्थ ह्यांना अनुक्रमें विद्याशंकरस्वामी व भारतीकृष्णतीर्थ हीं नांवें दिलीं आहेत.[१८] परंतु त्यांत दिलेल्या त्यांच्या अभिषेकाच्या

१४. Mysore Arch. Report for 1916, p. 57.

१५. Mysore Arch. Report for 1916, p. 56.

१६. Mysore. Arch Report for 1916, pp.12, 15, 57

१७. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३२२.

१८. Mysore Gazetteer by B. Lewis Rice, C. I. E., M. R. A. S., Westminster 1897, vol. 1, p, 474.






अनुक्रमणिका

व समाधीच्या मिति, उपलब्ध झालेल्या अस्सल लिखितांतील मजकुराला जुळत नाहींत.

इ. स. १३४६ त विजयनगरच्या साम्राज्याची सरहद्द पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत भिडून मोठ्या थाटाचा जयोत्सव करण्यांत आला, तेव्हां साम्राज्यसंस्थापक हरिहरादि पांचहि बंधु आप्तमंडळी-सह शृंगेरीस जाऊन त्यांनीं तेथें बराच दानधर्म केला, ह्याविषयींचा लेख शृंगेरी येथें आंजनेय देवळाच्या दक्षिण भिंतीवर आहे. त्यांत विद्यातीर्थ व भारतीतीर्थ ह्या दोन स्वामींचींच नांवें असून विद्यारण्याचा उल्लेख मुळींच नाहीं.[१९] ह्यावरून त्या वेळीं विद्यारण्यानें संन्यास घेतला नव्हता किंवा तो शृंगेरीस नसून काशीस अथवा दूर अंतरावरच्या प्रदेशीं होता, ह्या-वांचून तिसरें अनुमान करवत नाहीं.

**दुसरा उल्लेखः**—मन्मथ संवत्सरांतील उल्लेखा-नंतर सुमारें १९ वर्षांनीं म्हणजे इ. स. १३७५ त ( शक १२९७, राक्षस, कार्तिक ) मंगळूर तालु-क्यांतील कुडुपु गांवांतील अनंतपद्मनाभस्वामीच्या देवळांतील शिलालेखांत विद्यारण्याचा दुसरा विश्वसनीय उल्लेख सांपडतो. त्यांत मंगळूर राज्यांतील प्रतिहस्त पंडरिदेव ह्यानें पहिल्या बुक्करायाच्या आज्ञेवरून शृंगेरींतील शंकरदेवाच्या ( विद्याशंकर देवाच्या ) नैवेद्यासाठीं कुडुपु व मूलूरु ह्या गांवांतील कांहीं उत्पन्न सिंगेरीच्या ( शृंगेरीच्या ) विद्यारण्य श्रीपादाला दान दिलें असें म्हटलें आहे.[२०]

वरील दोन्ही उल्लेखांवरून १३५६ व १३७५ सालांत विद्यारण्य संन्यासी होता, ह्यांत संशय राहत नाहीं. अर्थात् ह्या सालांच्या दरम्यान त्यानें लिहिलेल्या ग्रंथांत, संन्यासधर्माच्या नियमांप्रमाणें, त्याला आपलें पूर्वाश्रमींचें नांव घालतां येत नाहीं. त्यानें विद्यारण्य हेंच नांव घातलें पाहिजे. बुक्करायाचा कुलगुरु भारद्वाजगोत्री मायणाचा मुलगा माधवाचार्य ह्यानें आपला कालमाधव ऊर्फ कालनिर्णय इ. स. १३५९ त (शक १२८१ विकारी) पूर्ण केला असें त्यांतील मलमासनिर्णयावरून मीं सिद्ध केलें आहे.[२१] ह्या ग्रंथांत कर्त्यानें आपलें नांव **माधवाचार्य** असें स्पष्ट दिलें आहे.[२२] हा माधवाचार्यच जर विद्यारण्यस्वामी, तर १३५९ त तो धडधडीत संन्यासी असतां त्यानें पूर्वाश्रमींचें माधव नांव कसें व कां वापरावें ह्याचा उलगडा होत नाहीं. ज्याअर्थी त्यानें तें वापरलें आहे, त्याअर्थी विद्यारण्याहून तो वेगळा हें सांगणें नकोच.

**तिसरा उल्लेखः**—वरील शिलालेखानंतर दोन वर्षांनीं म्हणजे पिंगळ संवत्सराच्या कार्तिकांत (इ. स. १३७७), बुक्करायाच्या मृत्युपूर्वी सुमारें चार महिने, विद्यारण्याचा तिसरा उल्लेख एका शिलालेखांत आढ-ळतो. त्यांत त्याला **'परमहंस परिव्राजकाचार्य वेदमार्गप्रतिष्ठाचार्यरुमप्प सिंगेरिय विद्या-रण्य श्रीपादंगळ'** असें म्हटलें असून,त्याच्या समक्ष लखण्ण ओडेयर नांवाच्या अधिकाऱ्यानें, वीर विरुपण्ण ओडेयराच्या हुकुमानें, नागूर अग्रहाराच्या दाग-दुजीसाठीं १०० होन दिले असें म्हटलें आहे.[२३] ह्यांतील मायन्यावरून १३७७ त विद्यारण्यस्वामी शृंगेरीच्या पीठावर अधिष्ठित होता ह्यांत मुळींच संशय राहत नाहीं. ह्यापूर्वी तीन वर्षें म्हणजे १३७४ त भारतीकृष्णतीर्थ ऊर्फ भारतीतीर्थ समाधिस्थ झाला होता.[२४] ह्यावरून त्या वर्षीच विद्यारण्याचा योगपट्टा-

१९. Epi. Carn. vol. 6, शृंगेरी जहागीर Insc. No. 1, on stone, p. 190.

२०. Annual Report on South Indian Epigraphy for the year ending 31st March 1929, Madras 1931 p. 44.

२१. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३०९–१०.

२२. व्याख्याय **माधवाचार्यो** धर्मान् पाराशरानथ। तदनुष्ठानकालस्य निर्णयं वक्तुमुद्यतः। ४। कालमाधव, प्रकाशक बाबू वाराणसीप्रसाद, काशी १८७६, मंगला-चरण पृ.१.

२३. Epi. Carn. vol. 6, कोप्प तालुक Insc. No. 19 at नागलापुर on stone, p. 170

२४. Mysore Arch. Report for 1916, p. 18.




अनुक्रमणिका

भिषेक झाला हें उघड आहे. असें असतां रा. रा. महादेव राजाराम बोडस, एम. ए., एलएल. बी., तो १३८० सालीं झाल्याचें सांगतात तें बरोबर नाहीं.[२५] प्रस्तुत शिलालेखांत विद्यारण्याला **वेदमार्गप्रतिष्ठाचार्य** ही पदवी लावली आहे. माधवाचार्यानें पराशरस्मृतिव्याख्येंत पहिल्या बुक्करायाला लावलेली **वैदिक मार्गप्रवर्तक**[२६] व नल्लूरच्या इ. स. १३९९ (शक १३२१) च्या ताम्रपटांत दुसऱ्या हरिहराला लावलेली **वैदिकमार्गस्थापनाचार्य**[२७] ह्या पदव्यांप्रमाणेंच विद्यारण्याला लावलेली पदवी दिसते. बुक्क व हरिहर ह्या राजांनीं हिंदुधर्मग्रंथांच्या पुनरुज्जीवनांत व वेदांवरील भाष्य तयार करविण्यांत जसा भाग घेतला, तसाच विद्यारण्यानेंही घेतल्यामुळें त्याला ती पदवी लावण्यांत आली आहे, हें उघड आहे. ती प्राप्त होण्यास वेदांवर ग्रंथरचनाच केली पाहिजे असें दिसत नाहीं. तथापि विद्यारण्य हा एक जाडा संस्कृत पंडित असून त्यानें वेदान्तविषयक कांहीं उत्कृष्ट ग्रंथ रचले असल्यामुळें कांहीं काळानें वेदभाष्याचें जनकत्वही त्याच्यावर लादण्यांत येऊं लागलें असावें. तो खरोखरच वेदभाष्याचा कर्ता असता तर ज्या काळीं प्रत्यक्ष तें चालू होतें त्या काळच्या १३७७ च्या शिलालेखांत त्याला नुसतें वेदमार्गप्रतिष्ठाचार्य म्हणण्याऐवजीं **वेदार्थकर्ता** किंवा **वेदभाष्यकर्ता** असें कांहीं तरी अन्वर्थक नांव लावण्यांत आलें असतें.

**चवथा उल्लेखः**—इ. स. १३७८ च्या (शक १३००, कालयुक्त) शिलालेखांत **विद्यारण्यश्रीपादाच्या** आज्ञेवरून प्रसन्नविश्वेश्वर नांवाच्या देवाला कांहीं जमीन दान दिली, असें म्हटलें आहे.[२८]

**पांचवा उल्लेखः**—शृंगेरी मठांतील एका कडितांत (हिशोबाच्या वहींत) इ. स. १३८० सालच्या ताम्रपटाची नक्कल आहे. त्यांत १३४६ पासून १३८०पर्यंत, पहिला हरिहर, पहिला बुक्क व दुसऱ्या हरिहराचा मुलगा चिक्कराय ह्यांनीं शृंगेरी मठास दिलेलीं दानें, दुसऱ्या हरिहरानें नवीन ताम्रशासनाच्या द्वारें **परमहंस परिव्राजकाचार्य विद्यारण्यश्रीपाद** ह्याच्या पायांवर मंजूर केलीं असें म्हटलें आहे.[२९]

**सहावा उल्लेखः**—इ. स. १३८४ च्या (शक १३०६, रक्ताक्षी) ताम्रपटांत, इतर राजांना दुर्मीळ असें ज्ञानाचें साम्राज्य, **विद्यारण्य मुनीच्या** कृपेनें दुसऱ्या हरिहराला मिळालें असें म्हटलें आहे.[३०]

**सातवा उल्लेखः**—इ. स. १३८६ च्या (शक १३०८, क्षय, द्वितीयाषाढ) ताम्रपटांत दुसऱ्या हरिहरानें नारायण वाजपेययाजी, नरहरि सामयाजी व पंडरि दीक्षित ह्या तिघां वैदिकांस, वेदभाष्याचे साहाय्यक म्हणून, परमहंस परिव्राजकाचार्य **विद्यारण्य श्रीपादासमक्ष**, कांहीं भूमि दान दिल्याचा मजकूर आहे. पांच वर्षांपूर्वी म्हणजे १३८१त (शक १३०३, दुर्मति) हरिहराचा मुलगा चिक्कराय ह्यानें त्यांना त्यांच्या साहाय्याबद्दल कांहीं वराह दिले होते (बहुधा देऊं केले होते); त्यांऐवजीं वरील भूमि दान दिली असें ताम्रपटांत म्हटलें आहे.[३१]

**आठवा उल्लेखः**—इ. स. १३८७ त (शक १३०९ क्षय [प्रभव?], ज्येष्ठ बहुल १३, शनिवार) जून महिन्याच्या १५ तारखेस **विद्यारण्य श्रीपाद समाधिस्थ झाल्यावर**, त्याच्या नांवानें दुसऱ्या हरिहरानें शृंगेरीच्या महाजनांस कांहीं जमीन दान देऊन तिला **विद्यारण्यपुर** हें नांव ठेवलें, अशा अर्थाचें एक ताम्रशासन उपलब्ध झालें आहे.[३२]

२५. वि. ज्ञा. विस्तार, व ६२, पृ. २८०.
२६. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३०८.
२७. Epi. Indica, vol. 3, p. 122.
२८. Epi Carn. Vol. 6, कोप्प तालुक Insc. No. 30 at भंडिगडे on stone, p. 175.

२९. Mysore Arch. Report for 1916, p. 57.
३०. Mysore Arch. Report for 1916, p. 58.
३१. Mysore Arch. Report for 1908, p. 14. Indian Historical Quarterly, vol. 7. p. 88.
३२. स्वस्ति श्री...शकवर्ष १३०९ क्षय...ज्येष्ठ बहुल १३ शनिवारदलु श्रीमन्...हरिहर महारायरु **श्रीविद्यारण्यश्रीपादंगळु परिपूर्णरादल्लि** ......सिंगेरिय प्रामाश्रित महाजनंगळिगे **श्रीविद्यारण्यपुरवागि** माडिदानधारापूर्वकवागि कोट्ट ताम्रशासन...
Mysore Arch. Report for 1916, p. 39.



शृंगेरीपासून एका मैलाच्या अंतरावर विद्यारण्यपुर अग्रहार असून तेथील देवळांत विद्याशंकर ह्या नांवानें विद्यातीर्थस्वामीची मूर्ति पूजेस लावली आहे.[३३] ह्या ताम्रशासनावरून विद्यारण्याच्या मृत्यूची तिथि निश्चित होऊन तिच्यासंबंधानें वाद राहत नाहीं. ताम्रशासनांत तो साक्षात् परंज्योतीचा अवतार असें म्हटलें आहे.[३४] त्याच्या पूर्वीचे स्वामी विद्यातीर्थ व भारतीतीर्थ ह्यांचाही स्तुतिपर उल्लेख ह्या ताम्रशासनांत आहे; परंतु विद्यारण्याच्या गौरवापुढें त्यांचें तेज फिकें पडतें. भारतीतीर्थस्वामीला विद्यातीर्थापासून झालेल्या कमळाची उपमा देऊन **विद्यारण्यरूपी सूर्याच्या किरणांनीं तें फुलतें** असें म्हटलें आहे.[३५] ह्याच्या शेजारीं 'भारतीतीर्थयतींद्राच्या कृपेनें आपण अप्रतिम कीर्ति मिळविली' ही जैमिनीय न्यायमालाविस्तरांतील माधवाचार्याची उक्ति[३६] ठेविली असतां, विद्यारण्य व माधवाचार्य ह्या दोन व्यक्ति एक नव्हत हा मुद्दा विशेष स्पष्ट होतो. कारण, माधवाचार्य हाच जर विद्यारण्य, तर त्याच्या (माधवाचार्याच्या) कृपेनें भारतीतीर्थ विकास पावणें व भारतीतीर्थाच्या कृपेनें विद्यारण्यानें (माधवाचार्यानें) अप्रतिम कीर्ति जोडणें हें म्हणणें विचित्र दिसतें. ह्यावरून, विद्यारण्य हयात असेपर्यंत माधवाचार्याचें कर्तृत्व त्याच्यावर लादलें जात नसून त्याची योग्यता माधवाचार्यावर कृपा करणाऱ्या भारतीतीर्थाहूनही अधिक मानीत असत असें दिसतें.

विद्यारण्य ८५ वर्षांच्यावर म्हातारा होऊन समाधिस्थ झाला, ह्याचा पुरावा म्हणून 'देव्यपराधस्तोत्रां'तील एका श्लोकाचा आधार दिला जातो.[३७] परंतु तें स्तोत्र त्याचेंच असल्याबद्दल पुरावा मिळत नाहीं. १३५६ च्या सुमारास तो काशी क्षेत्रीं होता हें वर सांगितलेंच आहे. तेव्हांपासून १३८७ पर्यंतचें ३१ वर्षांचें त्याचें नक्की वृत्त विश्वसनीय लिखितांवरून निश्चित झालें आहे. त्यापूर्वी त्यानें संन्यास केव्हां घेतला, पूर्वाश्रमांत किती काळ घालविला व काय केलें ह्याविषयींची खुलासेवार माहिती मिळत नाहीं. त्याच्यासंबंधाच्या दंतकथा बऱ्याच असून त्या त्याच्या मृत्यूनंतर बऱ्याच काळानें रचण्यांत आल्या असल्यामुळें त्यांच्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं. शृंगेरी मठाच्या गुरुपरंपरेंत त्याला इ. स. १३३१ त योगपट्टाभिषेक झाला असें म्हटलें आहे.[३८] परंतु त्याची जाडी विद्वत्ता, मोठी योग्यता व कर्तृत्वशक्ति लक्षांत घेतां, खुद्द शृंगेरींतील अस्सल लेखांत १३५६ पर्यंत त्याचा नामनिर्देशही असूं नये हें आश्चर्य आहे. त्या वेळेपर्यंत सतत २५ वर्षें शृंगेरी सोडून तो काशीस होता हें संभवनीय दिसत नाहीं, व शृंगेरी मठाच्या गुरुपरंपरेवर विश्वासतां येत नाहीं.

**विद्यारण्याविषयींच्या खोट्यानाट्या आख्यायिकाः**—विद्यारण्य समाधिस्थ झाल्यावर कांहीं काळानें ह्या आख्यायिकांना सुरवात झाली असावी. त्यांचा स्पष्ट पुरावा दीडशें वर्षांनंतरच्या एका शिलालेखांत सांपडतो. हा शिलालेख इ. स. १५३७ चा ( शक १४५९, विलंबी, कार्तिक ) असून त्यांत हंपीच्या विरूपाक्ष देवाच्या आज्ञेनें, ( पहिल्या ) **हरिहररायान** १२६ योजनें विस्तृत अशा कुंतळ देशाच्या आधिपत्याखालील तुंगभद्रा

३३. Mysore Arch. Report for 1916, p. 19.

३४. **विद्यारण्यगुरुं किमप्यवयवी ज्योतिः परं मन्यते ।** Mysore Arch. Report for 1916, p, 38.

३५. विद्यातीर्थाज्जनिमति शुभ भारतीतीर्थपद्मे। नित्यव्यक्ताद्वयचिदमृभानंदसौरभ्यभाजी । विद्यारण्यद्युमणिमहिमाप्राप्तलक्ष्मीविकासे । भूयोभूयो विहरति सुखी बुक्कभूपालहंसः। Mysore Arch. Report for 1916, p. 38.

३६. स भव्याद् भारतीतीर्थयतींद्रचतुराननात् । कृपामव्याहतां लब्ध्वा परार्ध्यप्रतिमोऽभवत् । ७। वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३१०.

३७. परित्यक्ता देवा विविधपरिसेवाकुलतया । मया पंचाशीतेरधिकमपनीते तु वयसि। Ind. Ant, Vol. 45 p. 20.

३८. Mysore Gaz. vol. I p. 474.




अनुक्रमणिका

नदीच्या कांठीं **विद्यानगरीचें सिंहासन बांधून विद्यारण्यश्रीपादाच्या नांवानें स्थापिलें** असें म्हटलें आहे.[३९] हा मजकूर इतिहासाच्या कसोटीस कितपत उतरतो तें पाहूं.

पहिल्याप्रथम विद्यानगरीचें सिंहासन अर्थात् विद्यानगरीची राजधानी पहिल्या हरिहरानें बांधली ह्याला चवदाव्या शतकांतील अस्सल कोरींव लेखांत मुळींच आधार नाहीं. इ. स. १३७८ च्या ( शक १३००, कालयुक्त, मार्गशीर्ष ) एका ताम्रपटांत **विजयानगरी पहिल्या बुक्कानें बांधली** असें स्पष्ट म्हटलें आहे.[४०] तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर हंपी नांवाचें जें एक क्षेत्र आहे, तेथेंच ही नगरी बांधली गेली. ह्या बांधकामास केव्हां आरंभ झाला तें नक्की सांगतां येत नाहीं. इ. स. १३४६ चा जयोत्सव होईपर्यंत राज्याचा कारभार **हस्तिनी नगरींत** चालत होता ह्याचा पुरावा १३४७ च्या फेब्रुवारीच्या (शक १२६८, व्यय, माघ) एका ताम्रपटांत मिळतो. त्यांत पहिला हरिहर हस्तिनी नगरींत राहून मत्सररहित बंधूंसह समबुद्धीनें राज्य चालवीत असे असें म्हटलें आहे.[४१] ही हस्तिनी नगरी ऊर्फ आनेगुंदी तुंगभद्रेच्या उत्तर तीरावर वसली आहे. 'आने' हा कानडी शब्द असून त्याचा अर्थ हत्ती असा होतो.[४२] विजयनगरचें साम्राज्य उभारण्यासाठीं हरिहरादि पांच बंधु व सरदार ह्यांनीं प्रथम आनेगुंदी एथेंच प्रयत्न केला असला पाहिजे. कारण हें स्थान वीरांच्या पराक्रमाची साक्ष देत आहे असें जें वरील ताम्रपटांत म्हटलें आहे तें त्यांनाच उद्देशून असावें.

विद्यानगर ह्या मूळ शब्दावरून विजयानगरी, विजयनगरी किंवा विजयनगर हीं अपभ्रष्ट रूपें झालीं आहेत असें वाटतें. **विद्यानगर** हा शब्द इ. स. १३५५ च्या ( शक १२७७, जय [ मन्मथ ? ], वैशाख ) एका ताम्रपटांत पहिल्यानेंच आढळतो. त्यांत ( पहिला ) बुक्कराय **विद्यानगरच्या** रत्नसिंहासनावर बसून पृथ्वीचें साम्राज्य चालवीत होता, असें म्हटलें आहे.[४३] ह्यावरून इ. स. १३५४ च्या सुमारास विद्यानगर राजधानी बांधून तयार झाली असावी असें दिसतें. ह्या वेळीं पहिला हरिहर हयात असून, वृद्धापकाळामुळें राज्यकारभारांतून त्यानें आपलें अंग काढल्यामुळें राजधानी बांधण्याचें काम बुक्कानेंच आपल्या शिरावर घेतलें व १३७८ च्या ताम्रपटांत वर्णिल्याप्रमाणें तिचें सर्व श्रेय बुक्काच्याच पदरांत पडलें. १३५५च्या वैशाखांत बुक्कराय विद्यानगरच्या सिंहासनावर बसून जरी राज्य चालवूं लागला, तरी पुढें निदान एक वर्षभर त्यानें आपली युवराजपणांतील राजधानी जी होसपट्टण ती अगदींच सोडून दिली होती असें दिसत नाहीं. १३५५ च्या ज्येष्ठांत ( शक १२७७, मन्मथ ) व १३५६ च्या आषाढांत ( शक १२७८, दुर्मुख ) तो होसपट्टण राजधानींत राहून सुखानें राज्य चालवीत असल्याचा

---

३९. १२६ योजनव् अह राष्ट्रद कुंतळदेशाधिपत्यके सलुव तुंगभद्रा तीरदिं पंपाविरूपाक्षलिंगन निरूपदिं **विद्यारण्यश्रीपादंगळ नामधेयदिं श्रीहरिहररायरु** कट्टिसि **प्रतिष्ठेय्** आगि निंद **विद्यानगरी** सिंहासनक्के कर्त्तर...Epi.Carn.vol. 11, चितळद्रुग तालुक Insc. No. 45 at गुंटनूरु on stone near ध्यामव्वा temple, p. 21.

४०. **श्रीबुक्कराजो** विजयोर्जितश्रीः ।...विजित्य विश्वं **विजयाभिधानां विश्वोत्तरां यो नगरीं व्यधत्त** । Epi. Carn. vol. 5, चन्नरायपत्नतालुक Insc. No.256 at हुलिकेरे, pp. 520-521.

४१. **वीरविक्रमकथैकसाक्षिणी हस्तिनीति नगरी** गरीयसा । पालिता **हरिहरेण** भूभुजा भ्रातृभिर्विगतमत्सरैः **समम्** । Epi. Carn. vol. 8, सोरब तालुक Insc. No. 375, p. 136.

४२. JBBRAS vol. 12,, p. 336.

४३. श्रीमद्राजाधिराज राजपरमेश्वर श्रीवीरप्रताप **श्रीबुक्करायदेव** महारायलय्यवारु **विद्यानगरमंदु** रत्नसिंहासनारूढुडै पृथ्वीसाम्राज्यं सेयुचुंडि...Epi. Carn. vol. 12 पावुगड तालुक Inse. No. 74 at पोतगानहळ्ळि, p. 218.




अनुक्रमणिका

उल्लेख दोन शिलालेखांत आढळतो.[४४] पहिल्या हरिहरानें केलेल्या व्यवस्थेप्रमाणें युवराज ह्या नात्यानें बुक्करायाची नेमणूक होयसण देशावर होऊन त्यानें होसपट्टण नांवाची राजधानी केली होती हें दुसऱ्या लेखांकांत आलेंच आहे.[४५] ह्यामुळें जुनी राजधानी एकदम सोडून देणें बुक्करायास अशक्य झालें असावें. १३५६ नंतर होसपट्टणचा उल्लेख पुन्हा आढळत नाहीं. आनेगुंदीची मात्र अशी अवस्था झाली नाही. विजयनगरच्या साम्राज्याचें तें आद्यस्थान असून पहिल्या हरिहराची राजधानी असल्यामुळें तिचा मान व दर्जा वडीलपणाचा होता. ह्यामुळें विद्यानगर अस्तित्वांत आल्यानंतर बराच काळ तिला विसरणें विजयनगरच्या सम्राटांना जड जाऊं लागलें. निदान चवदाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत राजधानीचें ठिकाण ह्या नात्यानें त्यांनीं आनेगुंदीचा संबंध तोडला नाहीं. इ.स.१३६९त (शक १२९०, कीलक, माघ) पहिला बुक्कराय **हस्तिनावतिपट्टन**हून राज्य चालवीत होता असें म्हटलें आहे.[४६] १३७९ (शक १३०१ सिद्धार्थी, भाद्रपद), १३८९ (शक १३११ शुक्ल, कार्तिक), १३९५ (भाव, फाल्गुन) व १३९९ (शक १३२१, बहुधान्य, आषाढ) ह्या चार सालच्या शिलालेखांत, दोन्ही राजधान्यांचीं नांवें एकत्र जोडून **हस्तिनावतिय दुर्गद विजयानगरींत** किंवा **हस्तिनापुर--विजयानगरींत** (दुसरा) हरिहरराय राज्य चालवीत होता, असें म्हटलें आहे.[४७] ह्याच्यानंतर आनेगुंदी राजधानीचें नांव कोरींव लेखांत कधींमधीं क्वचितच आढळतें.

विद्यानगराचें **विजयनगर** असें रूप इ. स. १३६८ च्या (शक १२९०, कीलक, कार्तिक) शिलालेखांत पहिल्यानेंच आढळतें. त्यांत बुक्कराय **अभिनव विजयनगरच्या** मोठया सिंहासनावर बसला असल्याचें वर्णन आहे.[४८] ह्यावरून 'विद्ये'चें 'विजय' असें रूप होण्यास सुमारें तेरा वर्षें लागलीं असें दिसतें. ह्यानंतर विजयनगरी, विजयानगरी, विजयानगर अशींही रूपें आढळतात व क्वचित् विद्यानगर हें मुळचें रूपही डोकावतें.[४९]

वरील विवेचनावरून विद्यानगर राजधानी पहिल्या हरिहरानें बांधली नसून बुक्करायानें बांधली व मूळ विद्यानगराचा विजयनगर हा अपभ्रंश आहे हें स्पष्ट झालें. आतां हें नगर विद्यारण्यश्रीपादाच्या नांवानें बांधलें गेलें नाहीं हें सिद्ध करावयाचें आहे. विद्यारण्याचा विश्वसनीय उल्लेख १३५६ च्या पूर्वी आढळत नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. तो त्या वेळीं काशीक्षेत्रीं असला तरी विजयनगरच्या साम्राज्याशीं त्याचा संबंध असल्याचा बळकट पुरावा मिळत नाहीं. ह्याच्या उलट **विद्यातीर्थाच्या** संबंधाचा बराच पुरावा मिळतो व त्याच्याच गौरवासाठीं त्याचें नांव नव्या राजधानीला दिलें गेलें असावें. विद्वान संशोधक कै. शामराव विठ्ठल कायकिणी ह्यांच्या मतें विजयनगरची राजधानी व साम्राज्य ज्या स्वामीच्या

---

४४. Epi. Carn. vol. 11, चितळदुग तालुक Insc. 2 & 3 at संपिगेसिद्धेश्वर temple, on stone, pp, 2, 3.

४५. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३१४.

४६. Epi. Carn. vol. 6, कोप्प तालुक Inc. No. 6 at बाळेहोन्नूर on stone, p. 167.

47 Epi. Carn. vol.7, होन्नाळि तालुक Insc. No. 84 on stone at ईश्वरापुर, p. 308. Epi. Carn. vol. 8, सोरब तालुका Insc. No. 116, 103 and 105 on stones at हिरे-आवलि pp. 30, 27, 28.

४८ **अभिनव विजयनगर** महासिंहासनशिखराधिरोहकौतूहल ... **श्रीवीरबुक्कराजस्य** ... Epi. Carn. vol. 7. शिकारपुर तालुक Insc No. 281 on stone, p. 257.

४९ हरिहरराय महारायरु **श्रीविद्यानगरद** सिंहासनदल्लु Epi. Carn. vol. 6, कोप्प तालुक Insc. No. 49 at हरिहरपुर on stone, शक १३१५ आंगिरस (इ. स. १३९३) p. 182.





अनुक्रमणिका

प्रेरणेनें उभारलीं गेलीं, तो **विद्यातीर्थ** होय.[५०] त्याच्याच कृपेनें बुक्करायाचें सिंहासन अढळ होऊन तो सर्वज्ञ झाला, असें माधवाचार्यानें म्हटलें आहे.[५१] अशाच तऱ्हेचा आणखी उल्लेख इ. स. १३७७ च्या ( शक १२९८, नळ, फाल्गुन ) ताम्रपटांत आढळतो. त्यांत **विद्यातीर्थ** मुनीच्या कृपेनें बुक्क फार वैभवशील झाला असें म्हटलें आहे.[५२] ह्यावरून विद्यानगर हें नांव **विद्यातीर्थ** स्वामीच्याच गौरवासाठीं ठेवण्यांत आलें, ह्यांत शंका नाहीं. खरा इतिहास असा असतां, विद्यानगर विद्यारण्यानें बांधलें, असेंही म्हणणारे दोन ताम्रपट आढळतात. त्यांपैकीं एक गोरिबिदनूर तालुक्यांतील असून दुसरा मुळबागल तालुक्यांतील आहे. दोहोंतील मजकूर सारखाच असून, मल्लणाराध्यवर्य वाधमूर्ति नांवाच्या कवीनें त्यांतील श्लोकरचना केली व नागिदेव नांवाच्या शिल्पकारानें ताम्रपट कोरले असें म्हटलें आहे. विद्यारण्यानें बांधलेल्या विद्यानगरींत बुक्कराय रत्नसिंहासनावर बसला असें वाक्य त्यांत आहे.[५३] महाकवि नाचन सोम ह्याला बुक्करायानें पेंचुकलदिन्न नांवाचा गांव बुक्करायपुर ह्या नांवानें दान दिला हा त्यांतील मुख्य विषय आहे. दोन्ही ताम्रपटांतील श्लोकरचना सारखीच असून कवीचीं व कोरक्याचीं नांवें जरी सारखींच आहेत, तरी गोरिबिदनूरचा ताम्रपट बराच शुद्ध असून मुळबागलच्या ताम्रपटांत कांहीं चुका आहेत. ह्यावरून पहिला ताम्रपट पहिल्यानें तयार झाला असून दुसरा ताम्रपट हा त्याची मागाहून कोणी तरी कांहीं कारणामुळें करविलेली नक्कल आहे हें उघड दिसतें. परंतु पहिला ताम्रपट खोटा आहे हें त्यांतील मजकुरावरून दाखवितां येतें. त्यांत दानाची मिति शक १२१६, तारण, चैत्र शुद्ध ९ मी दिली आहे ती बरोबर नाहीं.[५४] ह्या शकवर्षांत तारण संवत्सर चालू नसून **जय** संवत्सर चालत होतें. शिवाय, प्रचलित खोट्या आख्यायिकांप्रमाणेंही ज्या साम्राज्याची स्थापना शक १२५८ त झाली त्या साम्राज्यावर शक १२१६ त म्हणजे ४२ वर्षें अगोदर बुक्करायाची सत्ता चालणें संभवनीय नाहीं, हें सांगणें नकोच. त्या वेळीं म्हणजे इ. स. १२९४त बुक्करायाचा कदाचित् जन्मही झाला नसेल. दुसरें, ह्या ताम्रपटांत बुक्करायानें सोळा महादानें दिलीं असल्याचा उल्लेख आहे,[५५] तोही बरोबर नाहीं. चवदाव्या शतकांत विजयनगरच्या राजपुरुषांत सोळा महादानें दिल्याबद्दलची कीर्ति दुसऱ्या हरिहराच्याच नांवानें गाजते. ह्याविषयींची विस्तृत माहिती दुसऱ्या लेखांकांत आली आहे.[५६] ह्यावरून हा ताम्रपट व त्याची मागाहून तयार झालेली अशुद्ध प्रत हीं दोन्ही **बनावट** आहेत ह्यांत शंका नाहीं.

---

( टीप एकुणपन्नास चालू )

**श्रीकृष्णराय** महारायरु **विद्यानगरदल्लि** सिंहासनारूढरागि...Epi. Carn. vol. 6, **मूडगेरे** तालुक Insc. No. 88 at **नूचे** on stone, **शक** १४३७, युव, ( **इ. स.** १५१५ ), p. 165.

५०. JBBRAS. vol. 22, p. 370.

५१. **विद्यातीर्थ**मुनिस्तदात्मनि लसन् मूर्तिस्त्वनुग्राहिका । तेनास्य **स्वगुणैरखंडितपदं सार्वज्ञमुद्योतते** । ३ । जैमनीयन्यायमालाविस्तर, मंगलाचरण.

५२. **विद्यातीर्थमुनेः कृपांबुधिशशी भोगावतारोऽभवत्** । Epi. Carn. vol.4, येडातोरे तालुक Insc. No. 46 at हेब्बसुरु, p. 98.

५३. **बुक्करायो**ऽभवच्छ्रीमान् भुजार्जितपराक्रमः ।...। **विद्याभिधाननगरी** विजयोन्नतिशालिनी। **विद्यारण्यकृता तस्यां रत्नसिंहासने स्थितः** । Epi. Carn. vol. 10, **गोरिबिदनूर** तालुक Insc. No. 46 at **होसूरु** p. 270; **मुळबागल** तालुक Insc. No. 158 at **मुदियनूर** p. 135.

५४. अलंकृते **शकस्याब्दे रसभूनयनेंदुभिः** । **तारणाब्दे** चैत्रमासे नवम्यां शुक्लपक्षके Epi. Carn. vol, 10, **गोरिबिदनूर** तालुक Insc. No. 46,p.270.

५५. यस्मिन् **षोडशदानानां** धरायां परिशोभिते । दानांबुधारया तस्य वर्धते धर्मपादपः । Epi. Carn. vol. 10, गोरिबिदनूर तालुक Insc. No. 46, p. 270.

५६. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३२४.






अनुक्रमणिका

विद्यारण्यानें विद्यानगर बांधल्याची आख्यायिका पहिल्या प्रथम सतराव्या शतकांत निघाली असावी असें दिसतें. इ. स. १६५२ चा ( शक १५७४, नंदन, भाद्रपद ) एक ताम्रपट शृंगेरीनजीक विद्यारण्यपुर एथें आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, '**चार वेदांचा भाष्यप्रवर्तक विद्यारण्यमुनि** ह्यानें आपल्या तपोबलानें पंपातीरावरील विरूपाक्ष देवाला प्रसन्न करून जगावर उपकार करण्याच्या हेतूनें विद्यानगर शहर निर्मिलें व गाई, देव व ब्राह्मण ह्यांचें रक्षण करण्यासाठीं हरिहर नांवाच्या राजाला सिंहासनावर बसविलें. ह्या राजानें विद्यारण्याला विनंति केली कीं, शंकराचार्यांनें स्थापलेल्या धर्मपीठासाठीं शृंगेरींत एक मठ व अग्रहार असला पाहिजे.' मठांतील मल्लिकार्जुन, विद्याशंकरस्वामी व शारदा-अम्म ह्या देवतांची पूजा-अर्चा व वैदिक कर्में करण्यासाठीं त्यानें शृंगपुर व विद्यारण्यपुर नांवाचे अग्रहार विद्यारण्यभारतीस्वामीच्या पायांवर समर्पण केलें.[५७]' हा मजकूर, त्या वेळीं शृंगेरी मठांत अधिष्ठित असलेला स्वामी सच्चिदानंदभारती ह्याच्या हातचा आहे. खऱ्या इतिहासाला तो मुळींच जुळत नाहीं. स्वामीच्या मठांत व आसपास पूर्वीचे शिलालेख व ताम्रशासनें वरींच होतीं; परंतु तीं वाचून त्यांचा अर्थ समजून घेण्याची आस्था कोणालाच नव्हती. ह्यामुळें वरील अनैतिहासिक मजकूर कोरण्यांत आला. त्यांत हरिहरानें शृंगपुर नांवाचा अग्रहार विद्यारण्याला समर्पण केला, असें जें म्हटलें आहे तें मुळींच खरें नाहीं. अस्सल कोरींव लेखांत पहिल्या हरिहराचा व विद्यारण्याचा संबंध मुळींच आढळत नाहीं. इ. स. १३४६ त हरिहरानें जयोत्सवाच्या वेळीं शृंगेरीस जाऊन जो अग्रहार दिला, त्याला शृंगपुर अग्रहार अशी संज्ञा असून तो त्यानें **भारतीतीर्थाला** दिला.[५८] विद्यारण्याला नव्हे. दुसरा विद्यारण्यपुरचा अग्रहार तर जयोत्सव झाल्यानंतर ४० वर्षांनीं म्हणजे इ. स. १३८७ त, **विद्यारण्य समाधिस्थ झाल्यावर**, दुसऱ्या हरिहरानें दिला, हें आठव्या उल्लेखांत आलेंच आहे. ह्यावरून, पहिल्या हरिहरानें विद्यारण्याला शृंगपुर व विद्यारण्यपुर अग्रहार समर्पण केले असें जें सच्चिदानंदभारतीचें म्हणणें तें साफ चुकीचें ठरतें; त्याचीं इतर विधानेंही खोट्या दंतकथांवर विश्वसून केल्यामुळें अनैतिहासिक झालीं आहेत.

वर उल्लेखिलेल्या १५३७ च्या शिलालेखाच्या काळीं, पुर्तुगेज व्यापारी फेर्नांव नूनिस हा विजयनगरास घोड्यांचा व्यापार करीत होता. तेथें असतांना वृद्ध लोकांच्या तोंडून ऐकलेल्या आख्यायिका व प्रत्यक्ष पाहिलेली स्थिति ह्यांच्या आधारानें त्यानें त्या वैभवसंपन्न हिंदु साम्राज्याची पुर्तुगेज भाषेंत उत्तम बखर लिहिली आहे. त्यांत विजयनगरच्या उभारणीसंबंधानें तो म्हणतो कीं, आनेगुंदीचा राजा देवोराव (देवराय) हा एके दिवशीं नदीच्या (तुंगभद्रेच्या) पैलतीरावरील रानांत डोंगरावर पारध करीत असतां,

---

५७. अस्माकं गुरवः पूर्वे **विद्यारण्यमुनीश्वराः । चतुर्णामपि वेदानां साधु-भाष्य-प्रवर्तकाः ।** पंपातीरनिवासश्रीविरूपाक्षप्रसादतः । तपोबलेन लोकानामनुग्रहविधित्सया । **निर्माय विद्यानगरं नृपं हरिहराभिधं ।** गोदेवद्विजरक्षार्थमभ्यषिंचन्नृपासने । ......श्रीमद् **हरिहरमहारायरु...विद्यारण्यश्रीपादंगळ** पादक्के बिन्नहं माडिकोंडु शृंगपुरदल्लि शंकराचार्यरु निर्माणव माडिद धर्मपीठदल्लि मठ अग्रहारव् इरबेक् एन्दु बिन्नहं माडिकोंडु मल्लिकार्जुन-श्रीविद्याशंकरस्वामि-शारदाअम्मनवरु मठदल्लि आह देवतापूजे वेदशास्त्रमुक्तागि नडसुव धर्मगळिगे भूस्वस्थेगळ परिच्छेदव माडि **शृंगपुर-विद्यारण्यपुरद** अग्रहारगळ निर्माणव...**विद्यारण्यभारतीस्वामिगळ पादक्के समर्पिसिदल्लि** Epi. Carn. vol. 6, शृंगेरी Insc. No. 11, pp. 195-196.

५८. **श्रीवीरहरियपोडेयरु......भारतीतीर्थश्रीपादंगळु** अवर शिष्यादिगळु आ-शृंगेरिय तीर्थवासदल्लु अनुष्ठानव माडिकोण्डिहदक्के आ-परिचार कराागि माडुव ब्राह्मरु नाल्वत्तक्के कोट्टशिळाशासनद क्रमव एन्तएः ...Epi. Carn. vol. 6, शृंगेरी Insc. No 1. on stone, p. 190.




अनुक्रमणिका

त्याच्या शिकारी कुत्र्यांना एक ससा डसला. वाघ, सिंह वगैरे क्रूर श्वापदांच्या अंगावर बेधडक चालून जाणाऱ्या त्या कुत्र्यांना त्या दुर्बळ सशावर झडप घालण्याचा हिय्या झाला नाहीं, हें पाहून देवरायाला आश्चर्य वाटलें. कांहीं वेळानें आनेगुंदीस जाण्यासाठीं तो मागें फिरला असतां नदीच्या कांठावर त्याला एक संन्यासी भेटला. त्याला त्यानें तो चमत्कार सांगून ती जागाही दाखविली. ती पाहून संन्याशानें त्याला तेथें एक नवीन शहर वसवून राजवाडा बांधण्यास सांगितलें व पृथ्वीवरील अत्यंत बलाढ्य व अजिंक्य असें तें शहर होईल असें भविष्य वर्तविलें. देवरायानें त्याप्रमाणें केलें व आनेगुंदी सोडून तो तेथें राहूं लागला. संन्याशाच्या नांवावरून त्यानें त्या नव्या राजधानीचें नांव **विद्याजुन** असें ठेवलें. ह्या नांवाचा आतां बिसनाग (विजयनगर) असा अपभ्रंश झाला आहे.[५९] ह्यांतील विद्याजुन हें विद्यारण्य शब्दाचें नूनिसच्या तोंडांत झालेलें विकृत रूप होय, हें उघड आहे.[६०] देवोराव ( देवराय ) हें विशेषनाम नसून विजयनगरच्या राजांना लागणारी ती एक सामान्य पदवी आहे.[६१] ह्या देवरायाच्या मागून गादीवर बसलेल्या राजाचें नांव नूनिसनें बुकाराव ( बुक्कराय ) असें दिलें असून त्याच्या पाश्चात् त्याच्या मुलाचें नांव पुरे-ओयरि–देवोराव ( हरिहर देवराय ) असें दिलें आहे.[६२] ह्यावरून वरच्या आख्यायिकेंतील देवराय म्हणजे पहिला हरिहर ह्यांत शंका नाहीं.

नूनिसनें दिलेली आख्यायिका थोड्याशा फरकानें दोन ताम्रपटांत आढळते. त्यांची मिति इ. स. १३३६ (शक १२५८, धातृ, वैशाख शु० ७ मी ) आहे. त्यांतील एकाचें नांव कापलुरचा ताम्रपट व दुसऱ्याचें नांव बेस्तरहळ्ळीचा ताम्रपट. पहिल्या ताम्रपटाविषयीं संपादक ए. बटरवर्थ व व्ही. वेणुगोपाळ चेट्टी म्हणतात, 'त्यांतील अक्षरांचें वळण अगदीं अलीकडचें आहे...ताम्रपट बनावट आहे. त्यांत पुष्कळ चुका आहेत.[६३]' ह्या ताम्रपटांतील मजकूर असा आहे कीं, कुंजरकोणपुरीचा (आनेगुंदी) राजा हरिहर एकदा शिकारीसाठीं आपल्या सैन्यासह तुंगभद्रेच्या पैलतीरावर गेला असतां दक्षिण भागीं त्याला एक रान दिसलें. तेथें एक सशाचें जोडें रतिक्रीडा करीत होतें. त्यांतील ससा एका कुत्र्याला डसतांना पाहून राजाला आश्चर्य वाटलें. साक्षात् विरूपाक्षदेव सशाच्या रूपानें पंपादेवीशीं रत झाला आहे, अशी कल्पना करून राजा भक्तिभावानें तेथून निघाला व विरूपाक्षाच्या देवळानजीक राहणाऱ्या विद्यारण्ययतीपाशीं जाऊन त्याला तो वृत्तान्त त्यानें कळविला. तेव्हां यति म्हणाला कीं, 'ही जागा मजबूत असून मोठ्या राजांनीं राहण्यालायक आहे. एथें तूं कुबेराच्या अलकापुरीप्रमाणें **विद्या नांवाची पुरी** बांध व नऊ दरवाजांनीं युक्त अशा त्या पुरींत इंद्राचें वैभव भोगून सर्व पृथ्वीचें राज्य कर.' ह्याप्रमाणें हरिहरानें केलें. तो सिंहासनावर बसला. त्यानें सोळा महादानें दिलीं व विशाळ विद्यानगरांत तो शोभूं लागला. त्यानें पंपाविरूपाक्ष देवाच्या समक्ष, शके १२५८, धातृ, वैशाख शु॥ ७मी, पुष्य नक्षत्रें, हरि लग्न मुहूर्तावर आपला पट्टाभिषेक केल्यानंतर अनंत सूरि नांवाच्या भिक्षुकाला कापलुर ऊर्फ हरिहरपुर नांवाचा अग्रहार करून दिला.[६४]

बेस्तरहळ्ळीच्या ताम्रपटाविषयीं संपादक राइस म्हणतो कीं, लोकांनीं पुरविलेल्या हस्तलिखित नकली-

५९. Chronica dos Reis de Bisnaga por David Lopes, Lisboa 1897, pp. 7-8.

६०. A Forgotten Empire by Robert Sewell, London 1900. p. 300, note 1.

६१. A Forgotten Empire, p. 298, note 2.

६२. Chronica dos Reis de Bisnaga, p. 8.

६३. A Collection of the Inscriptions on Copperplates and Stones in the Nellore District by A. Butterworth and V. Venugopal Chetty, Madras 1905, Part 1, p. 109.

६४. A Collection of the Inscriptions in the Nellore District, Part 1. pp. 120–122.



वरून आपण तो प्रसिद्ध केला. मूळ ताम्रपट लाकांना दाखवितां आला नाहीं. ह्यावरून त्याच्यावर विश्वासतां येत नाहीं.[६५] ह्यांतील पहिले २८ श्लोक फार थोड्या फरकानें कापलुर ताम्रपटांतील २ पासून २९ श्लोकांना बरोबर जुळतात. दोहोंतील मजकूर बहुधा सारखाच आहे. बेस्तरहळ्ळि ताम्रपटांतील अग्रहाराचें नांव विद्यारण्यपुर असून अरेकेरेंद्र भास्कराचा मुलगा पंपाविरूपाक्ष ह्याला तो दिला आहे.[६६] दोहोंतील मिति सारखीच आहे. दोन्ही ताम्रपट बनावट आहेत ह्याविषयींचा आणखी एक पुरावा त्यांत आढळतो तो हा कीं, ( पहिल्या ) हरिहरानें सोळा दानें दिलीं असें त्यांत म्हटलें आहे.[६७] वास्तविक हीं दानें ( दुसऱ्या ) हरिहरानें दिलीं असून पहिल्या हरिहरावर तीं चुकीनें लादलीं आहेत, ह्यांत शंका नाहीं. त्यांत दिलेली सशाची कहाणीही अपूर्व व अस्सल नाहीं. विजयनगरचें साम्राज्य अस्तित्वांत येण्यापूर्वी सुमारें दोनशें वर्षें थोड्याशा फरकानें ती प्रचलित होती. दोरसमुद्राचा यदुवंशी होयसळ राजा पहिला श्रीनारसिंह ह्याच्या इ. स. ११४८ च्या ( विभव, श्रावण ) शिलालेखांत म्हटलें आहे कीं, त्याचा पूर्वज सळराजा एकदा सह्याद्रीच्या उतरणीवर शिकार करीत असतां, एक ससा वाघाच्या पाठीस लागलेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. इतक्यांत एक ऋषि मोठ्यानें ओरडून म्हणाला, 'अरे सळराजा, त्या वाघाला मार ( अदं पोय सळ ); तो मला खायाला येत आहे.' हें ऐकून त्या पराक्रमी राजानें एका क्षणांत त्याला मारून टाकलें. तेव्हां ऋषीला आनंद होऊन त्यानें आपल्या तोंडांतून आलेला **पोयसळ** शब्द त्या राजाला बिरुदाप्रमाणें बहाल केला व वाघाचा यशस्वी ध्वज दिला. त्या वेळेपासून सळ राजाच्या घराण्याला पोयसळ ऊर्फ होयसळ हें नांव पडून त्या जागेला शशकपुर हें नांव मिळालें.[६८] ह्यावरून होयसळांची जुनीपुराणी आख्यायिका विद्यारण्याच्या चाहत्यांनीं सोळाव्या शतकांत त्याच्या नांवाला चिकटविली असावी असें दिसतें. अशीच आख्यायिका एका मुसलमान इतिहासकारानें बाहमनी सुलतान अहमदशहा (१४२२–३५) ह्याच्या नांवाला चिकटवून बेदर शहराच्या उभारणीशीं तिचा संबंध जोडला आहे.[६९]

सतराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून विद्यारण्याविषयींच्या आख्यायिकांस ऊत येऊं लागला असें दिसतें. १६६४ च्या सुमारास विद्यारण्यकालज्ञान नांवाची एक ग्रंथमाळा सुरू होऊन त्यांत बऱ्याच भाकडकथा घालण्यांत आल्या. ही माळा विद्यारण्याच्या आज्ञेवरून भारतीकृष्णतीर्थयतीनें रचली असें म्हणतात. आनेगुंदी एथें असलेल्या एका ताम्रशासनाची ती नकल आहे असेंही सांगतात. ह्या माळेंत चार फुलें गुंफिलीं आहेत. (१) विद्यारण्यवृत्त. ह्यांत विद्यारण्याचें आत्मचरित्र असल्याचें दाखविलें आहे. (२) विद्यारण्य शक. ह्यांतील कथा विद्यारण्यानें पहिल्या हरिहराला सांगून भारतीकृष्णयतीनें ती लिहिल्याप्रमाणें दाखविलें आहे. वेंकटेश नांवाच्या कोणी एकानें ती शृंगेरीच्या

---

६५. Epi. Carn. vol. 10 by B. Lewis Rice, C. I. E., M. R. A. S., Mangalore 1905, बागेपल्लि तालुक Insc. No. 70, at बेस्तरहळ्ळि, p. 241, Note 1.

६६. Epi. Carn. vol. 10. बागेपल्लि तालुक Insc. No 70, p. 301.

६७. विधाय खलु **षोडशप्रतिनिधीनि दानान्यहो** । व्यरोचत विशालसीम्नि नगरे हि विद्याभिधे । २६ । Epi. Carn. vol. 10, बागेपल्लि तालुक Insc. No. 70, p. 300.
A Collection of the Inscriptions in the Nellore District. Part 1, p. 121.

६८. Epi. Carn. vol. 5 बेलुर तालुक Insc. No. 171 at हळेबेळवाडी on stone, pp. 221, 224.

६९. A Forgotten Empire, p. 299, note 1.




अनुक्रमणिका

विद्यारण्य देवळांत शासनाप्रमाणें शिळेवर रचली असें म्हटलें आहे. (३) विद्यारण्यकालज्ञान. ह्यांत विजयनगरचा रामराय व त्याचे वंशज वगैरे पुढील राजांपर्यंतच्या इतिहासाचें भविष्य विद्यारण्यानें शंकराच्या कृपेनें वर्तविल्याप्रमाणें दिलें आहे.(४) पितामहसंहिता. ह्यांत विद्यारण्यानें केलेलें भविष्य ऐकून ब्रह्मदेवानें काश्यपऋषीला सांगितलेली विद्यारण्य व विजयनगर ह्यांची श्रीरंगराजापर्यंतची हकीकत दिली आहे.[७०] ह्या माळेंत विजयनगरच्या तिसऱ्या राजघराण्यांतील रामराय व रंगराज ऊर्फ रंग ह्यांचा उल्लेख असल्यामुळें ती चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत विद्यारण्याच्या आज्ञेवरून भारतीतीर्थानें रचली नाहीं, हें उघड आहे. ह्या माळेंतील पितामहसंहितेवरून केळदीचा राजा बसवराज ह्यानें १७०९ त रचलेल्या 'शिवतत्त्वरत्नाकरां'त विद्यारण्याची माहिती दिली असल्याचें स्पष्ट म्हटलें आहे.[७१] ह्यावरून विद्यारण्यकालज्ञानांतील खोटया आख्यायिका शिवतत्त्वरत्नकरांत आल्या आहेत हे सांगणें नकोच. त्यांत म्हटलें आहे कीं,विद्यारण्यानें हंपीच्या विरूपाक्षाला प्रसन्न करून घेऊन श्रीचक्राच्या आकृतीचें विजयनगर शहर बांधलें. तेथें पावणेचार घटिका सोन्याचा पाऊस पाडला व हरिहराला गादीवर बसविलें.संन्यास घेण्यापूर्वी विद्यारण्य हा एक गरीब ब्राह्मण असून त्याला मुलेंबाळें व नातवंडें पुष्कळ होतीं.[७२] ह्याच्यानंतर रचल्या गेलेल्या बहुतेक सर्व विद्यारण्यविषयक ग्रंथांत ह्या खोटया आख्यायिकांची आवृत्ति असून नवीन भाकडकथांची बरीच भर पडली आहे. अठराव्या शतकाच्या मध्यांत लिहिलेल्या गुरुवंशांत एकटया विद्यारण्यावरच वेदभाष्याचें कर्तृत्व लादलें आहे. त्या शतकाच्या अखेरीस लिहिलेल्या 'मणिमंजरीभेदिनी' नांवाच्या ग्रंथांत म्हटलें आहे कीं, माधव हा एक गरीब ब्राह्मण असून त्याला लग्न करण्याची ऐपत नव्हती. म्हणून त्यानें लक्ष्मीची आराधना केली. तेव्हां दुसऱ्या जन्मांत तो श्रीमंत होईल असें वचन त्याला मिळालें. त्याप्रमाणें त्यानें भारतीकृष्णतीर्थाकडून संन्यासरूपी दुसरा जन्म घेतला. त्यावेळीं त्याला विद्यारण्य हें नांव ठेवण्यांत आलें. 'विद्यारण्याष्टोत्तरशतनामावलि' नांवाच्या एका लहान ग्रंथांत विद्यारण्य हा एक मोठा योगी असून त्यानें हंपींत सोन्याचा पाऊस पाडला व तीन वेदांवर भाष्यें लिहिलीं वगैरे मजकूर आहे. 'आनेगोंदी बखरीं' त तर भाकडकथांची सीमाच झाली आहे. त्यांत विद्यारण्य विजयनगरच्या सिंहासनावर बसला; त्यानें २६ वर्षें राज्य चालविलें; इ. स. १३६२ त ( शक १२८४ ) त्यानें बुक्काला अभिषेक केला व १३९५ त ( युव संवत्सर ) तो मरण पावला असें म्हटलें आहे.[७३]

वरील आख्यायिका जरी अनैतिहासिक आहेत, तरी त्यांचा पगडा बऱ्याच विद्वानांवर बसला असून माधवाचार्य हाच विद्यारण्य ह्या समीकरणांत ते अजून गुरफटले आहेत. विद्वान संशोधक रावबहादुर आर. नरसिंहाचार, एम. ए., म्हणतात 'माधवाचार्य व विद्याहरण ह्या दोन्ही व्यक्ति एकच होत असें ठाम म्हणणारा एकही कोरींव लेख आढळल्याचें मला आठवत नाहीं. तथापि कोरींव लेख व ग्रंथ ह्यांतील विद्यारण्याविषयींचे कांहीं उल्लेख त्या दोन्ही व्यक्ति एकच होत्या असें दाखवितांना दिसता[७४].' हें सिद्ध करण्याकरितां त्यांनीं दिलेले पांच आधार व रा. रा. आर. राम राव, बी. ए., ह्यांनीं केलेल्या त्यांच्या खंडनाचा विशेष महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

( १ ) नृसिंहसूरीनें रचलेल्या तिथिप्रदीपिकेंत म्हटलें आहे कीं अनंताचार्य, मंचिगळ्ळु मंत्री,

७०. Indian Historical Quarterly, vol. 6, pp. 715-16.

७१. **विद्यारण्यकृतिं चैव पितामहसुसंहिताम् । विलोक्यायं विरचितः कल्लोलोऽभूच्चतुर्थकः । शिवतत्त्वरत्नाकर, अ. १२, कल्लोल ४,** Indian Hist. Quarterly, vol. 6, p. 716, note 1.

७२. Indian Hist. Quarterly, vol. 6, p. 715.

७३. Indian Hist. Quarterly, vol. 7, pp. 80-82.

७४. Ind. Ant. vol. 45, p. 18,



विद्यारण्य वगैरे ग्रंथकारांनीं कालनिर्णयावर चर्चा केली आहे. कालनिर्णय हा ग्रंथ माधवाचार्यांचा असल्याचें प्रसिद्ध आहे. ह्यावरून माधवाचार्य हाच विद्यारण्य होय.[७५]

**खंडन**:—तिथिप्रदीपिकेचा रचनाकाळ दिलेला नसून त्यांत मंचिभट्टाचा संग्रहकालनिर्णय, जयन्तीकल्प व तिथिदर्पण तसेंच कर्मप्रदीपिका, कनकगृह्य व पुष्करपुराण वगैरे अलीकडील ग्रंथांचा उल्लेख असल्यामुळें तोही अलीकडील ग्रंथ ठरतो व त्याच्या पुराव्याला महत्त्व देतां येत नाहीं.[७६] माधवाचार्य हाच विद्यारण्य असा चुकीचा समज लोकांत प्रसार पावल्यानंतर हा ग्रंथ तयार झालेला दिसतो.

(२) रंगनाथ नांवाचा ग्रंथकार व्याससूत्रवृत्तींत म्हणतो कीं आपला ग्रंथ विद्यारण्याच्या श्लोकांच्या आधारावर रचला आहे. हें म्हणणें माधवाचार्यांच्या वैयासिकन्यायमालाविस्तराला स्पष्ट उद्देशून आहे. ह्यावरून माधवाचार्य हाच विद्यारण्य होय.[७७]

**खंडन**:—वैयासिकन्यायमालाविस्तर हा ग्रंथ माधवाचार्यांचा नसून भारतीतीर्थाचा आहे.[७८] माधवाचार्यांचा जैमिनीयन्यायमालाविस्तर व भारतीतीर्थाचा वैयासिकन्यायमालाविस्तर ह्यांतील मंगलाचरणाच्या कांहीं श्लोकांत थोडेंसें साम्य दिसतें, ह्याचें कारण माधवाचार्य हा भारतीतीर्थाचा शिष्य असल्यामुळें त्यानें आपल्या गुरूच्या ग्रंथांतील कांहीं श्लोक स्वतःच्या ग्रंथांत उतरून घेतले हें होय. न्यायमालाविस्तरांत माधवाचार्य स्पष्ट म्हणतो कीं, भारतीतीर्थाची आपल्यावर फार मर्जी होती.[७९] शिवाय, नृसिंहाश्रम नांवाच्या ग्रंथकाराच्या उक्तींचाही व्याससूत्रवृत्तींत आधार घेतला आहे असें रंगनाथ म्हणतो. नृसिंहाश्रमाच्या ग्रंथाचें नांव अद्वैतदीपिका असून तो अप्पय दीक्षिताचा ( सुमारें इ. स. १५५४-१६२६ ) समकाळीन अर्थात् सोळाव्या शतकाच्या अखेरचा आहे. ह्यावरून व्याससूत्रवृत्ति हा अलीकडचा ग्रंथ असल्यामुळें ह्याही बाजूनें त्याचें महत्त्व नाहीं.[८०]

( ३ ) तेलुगु भाषेचें संस्कृतांत मोठें व्याकरण रचणारा अहोबल-पंडित हा माधवाचार्यांचा भाचा म्हणतात. माधवाचार्यांची धातुवृत्ति हा विद्यारण्याचा ग्रंथ असल्याप्रमाणें त्यानें उल्लेख केला आहे.ह्यावरून माधवाचार्य हाच विद्यारण्य होय.[८१]

**खंडन**:—अहोबल-पंडिताचें अहोबलीय व्याकरण हाही अलीकडचा ग्रंथ असून, इतरांचें कर्तृत्व व ग्रंथरचना विद्यारण्यावर लादून त्याला महत्त्व देणाऱ्या आख्यायिकेवर त्याची मदार असल्यामुळें त्याचा पुरावा कुचकामी म्हणून झिडकारला पाहिजे. सुप्रसिद्ध माधवाचार्य व अहोबल-पंडित ह्यांचें कांहींच नातें नाहीं. कारण

७५. अनंताचार्यवर्येण मंत्रिणा मंचिगळ्ळुना । **विद्यारण्ययतींद्राद्यैर्निर्णीतः कालनिर्णयः**। Ind. Ant. vol. 45, p. 18.

७६. Indian Hist. Quarterly, vol. 7, p. 90.

७७. **विद्यारण्यकृतैः** श्लोकै **नृसिंहाश्रमसूक्तिभिः** । संदृब्धा व्याससूत्राणां वृत्तिर्भाष्यानुसारिणी । Ind. Ant. vol. 45, p. 18.

७८. प्रणम्य परमात्मानं **श्रीविद्यातीर्थ**रूपिणम् । **वैयासिकन्यायमाला** श्लोकैः संगृह्यते स्फुटम् । इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य **श्रीभारतीतीर्थमुनिप्रणीतायां वैयासिकन्यायमालायां** प्रथमाध्यायस्य प्रथमः पादः । वैयासिकन्यायमाला, आनंदाश्रमसंस्कृतग्रंथावलिः पुणें १८९१, पृ. १, १६.

७९. स भव्याद् **भारतीतीर्थयतींद्रचतुराननात् कृपामव्याहतां लब्ध्वा परार्ध्यप्रतिमोऽभवत्** । । ७ । जैमिनीयन्यायमालाविस्तर, वि. ज्ञा. विस्तार, वं. ६३ पृ. ३१०.

८०. Indian Hist. Quarterly, vol. 7, p. 90.

८१. **वेदानां भाष्यकर्ता** विवृतमुनिवचा **धातुवृत्तेर्विधाता । प्रोद्यद्विद्यानगर्यां हरिहरनृपतेः सार्वभौमत्वदायी** । वाणी नीलाहिवेणी सरसिजनिलया किंकरीति प्रसिद्धा । **विद्यारण्यो** ऽ ग्रगण्योऽभवदखिलगुरुः शंकरो वीतशंकः । Ind. Ant. vol. 45. p. 18.




अनुक्रमणिका

इ. स. १६५६ त ( शक गज–शैल–शर–सुधाकर= १५७८) काकनूरि अप्पकवि ग्रंथकारानें अप्पकवीयम् नांवाची व्याकरणविषयक जी तेलुगु टीका लिहिली, तिच्यावर अहोबलीय हा एक गुणदोषविवेचक निबंध आहे. ता १७०० सालच्या सुमारास रचला असला पाहिजे. ह्यामुळें विद्यारण्याच्या बाबतींत त्याचें प्रामाण्य मानतां येत नाहीं. शिवाय, वेदभाष्य व धातुवृत्ति हे ग्रंथ माधवाचार्यांचे नसून सायणाचे आहेत व सायण हा विद्यारण्याहून निराळा ह्याबद्दल वादच नाहीं.[८२] अहोबलीय व्याकरणांत विद्यारण्यानें (पहिल्या) हरिहराला सार्वभौमत्व दिलें असें जें म्हटलें आहे, तेंही अनैतिहासिक आहे.

( ४ ) पंचदशीप्रकरण नांवाच्या ग्रंथाचा कांहीं भाग भारतीतीर्थानें व बाकीचा माधवाचार्यानें रचला असें म्हणतात. रामकृष्ण नांवाच्या ग्रंथकारानें त्यावर टीका लिहिली आहे. त्यांतील मंगलाचरणांत व समाप्तींत त्यानें भारतीतीर्थ व विद्यारण्य ह्या दोघांना नमन केलें आहे. भारतीतीर्थ हा माधवाचार्यांच्या गुरूंपैकीं एक होता, हें आपणास माहित आहेच. लगोलग त्याच्या नांवाशेजारीं विद्यारण्याचें नांव वरील टीकाकारानें घातलें असल्यामुळें माधवाचार्य व विद्यारण्य एक होत ह्या मताला बळकटी येते.[८३]

**खंडनः**—पंचदशीप्रकरणाच्या रचनेशीं माधवाचार्यांचा मुळींच संबंध नाहीं. ह्या ग्रंथाच्या कोणत्याच आवृत्तींत माधवाचार्याला त्याचा कर्ता म्हटलेलें नाहीं व ह्याविषयींचा इतर पुरावाही नाहीं. खुद्द पंचदशींत विद्यारण्याचें माधवाचार्यांशीं सारूप्य दाखविणारें एकही वचन नाहीं. शिवाय, पंचदशींत शंकरानंदाला नमन आहे ह्याच्या पलीकडे त्या ग्रंथाचा काळ ठरविण्यास कोणतेंच साधन नाहीं. विद्यारण्य नांवाचे स्वामी बरेच होऊन गेले. त्यांपैकीं इ. स. १५१५ त शृंगेरीमठांत एक होता. शक १५९१ त ( इ. स. १६६९ ) कुडलि मठाच्या स्वामीच्या गुरूचें नांव विद्यारण्य होतें. आवनि मठांतील बऱ्याच स्वामींचें नांव विद्यारण्य होतें. ह्यांपैकीं कोणत्या विद्यारण्यानें पंचदशी रचली हें ठरविणें अशक्य आहे.[८४] परंतु रावबहादुर आर. नरसिंहाचारांचा मुद्दा खोडून काढण्यास एवढें खोलांत शिरण्याचें कारण नाहीं. टीकाकार रामकृष्ण ह्यांच्या मतें भारतीतीर्थ व विद्यारण्य ह्या दोघांनीं पंचदशीप्रकरण लिहिलें. ह्यामुळें त्या दोघांचीं नांवें त्यानें एकमेकांच्या शेजारीं घालून त्यांना नमन केलें. त्यानें भारतीतीर्थाच्या शेजारीं माधवाचार्याला बसवून त्याला नमन केलें नाहीं. माधवाचार्य हा भारतीतीर्थाचा शिष्य असला, तरी रामकृष्णानें त्याला विद्यारण्य ह्या नांवानें कां नमन करावें, तें समजत नाहीं. ह्या युक्तिवादाप्रमाणें भारतीतीर्थाच्या इतर शिष्यांनाही विद्यारण्य बनण्याचा हक्क प्राप्त होईल. माधवाचार्याशिवाय त्याचे आणखीही विद्वान शिष्य होते.

( ५ ) इ. स. १३८६ च्या एका ताम्रशासनांत म्हटलें आहे कीं, नारायण वाजपेययाजी, नरहरि सोमयाजी व पंढरि दीक्षित ह्या पंडितांनीं वेदभाष्यांत मदत केली, म्हणून त्यांना दुसऱ्या हरिहरानें विद्यारण्य श्रीपादसमक्ष एक दानपत्र दिलें. आपणास माहित आहे कीं, वेदभाष्यांत माधवाचार्यांचें बरेंच अंग होतें; म्हणून त्याच्याच आज्ञेवरून त्या पंडितांना त्या कार्यांतील त्यांच्या श्रमाच्या मोबदल्यासाठीं तें दानपत्र दिलें असण्याचा फार संभव आहे. विद्यारण्य ही एक निराळीच व्यक्ति असती, तर त्याच्या समक्ष तें दानपत्र देण्याची कांहीं जरुरी नव्हती. ह्यावरून इ. स. १३८६ त जेव्हां तें दानपत्र दिलें गेलें, तेव्हां विद्यारण्य ह्या नावानें माधवाचार्य संन्यासाश्रमी होता हें उघड आहे.[८५]

---

८२. Indian Hist. Quarterly. vol. 7, p. 89.

८३. नत्वा **श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनीश्वरौ** । मयाद्वैतविवेकस्य क्रियते पदयोजना । इति— **श्रीरामकृष्णविदुषा विरचिता पददीपिका.** Ind Ant. vol. 45, p. 19.

८४. Indian Hist. Quarterly, vol. 7, pp. 91-92.

८५. Ind. Ant. vol. 45, p. 19.




अनुक्रमणिका

**खंडन**:—ह्या दानपत्राची मिति शक १३०८, क्षय, द्वितीयाषाढ शु.२ या मंगळवार आहे.[८६] ह्यांतील तिथीशीं वार जुळत नाहीं. शिवाय, ह्या मितीच्या पूर्वी कांहीं दिवस म्हणजे ज्येष्ठ व॥ १३ शी शनिवारीं विद्यारण्य समाधिस्थ झाल्याचा पुरावा दुसऱ्या एका ताम्रशासनांत मिळतो.[८७] ह्या विसंगतीमुळें वरील दानपत्राच्या अस्सलपणाचा संशय येतो.[८८] दुसरें, वेदभाष्याच्या कार्यांत केलेल्या मदतीसाठीं कांहीं वैदिकांना विद्यारण्यासमक्ष दान दिलें, एवढ्यावरून तो स्वतः वेदभाष्याचा कर्ता किंवा प्रवर्तक होता असें ठरत नाहीं. राजाच्या दानाला विशेष पावित्र्य आणण्या साठीं विद्यारण्य स्वामीसमक्ष तें दिलें असेल. शिवाय, तें दान नवीन नसून राजघराण्यांतील एका पुरुषानें कांहीं वर्षांपूर्वी वराहांच्या रूपानें दिलेल्या दानाऐवजीं तें जमिनीचें दान होतें. विद्यारण्यासमक्ष किंवा त्याच्या आज्ञेनें दिलेलीं इतर दानपत्रें बरींच आहेत; त्यांतही अशाच प्रकारचें सारूप्य किंवा हेतु स्वीकारावा लागेल. दान घेणारे ते तिघे वैदिक विद्यारण्याचे कदाचित् शिष्य असल्यामुळें त्याच्या समक्ष त्यांना तें दान दिलें असण्याचाही बराच संभव आहे.[८९]

( अपूर्ण )

८६. Mysore Archaeological Report for 1908, p. 14.

८७. Mysore Archaeological Report for 1916, p. 39.

८८. Indian Hist. Quarterly, vol. 7, p. 88. दानपत्रांतील तिथीशीं वार जुळत नाहीं ही बाब क्षुल्लक आहे. विद्यारण्याच्या मृत्यूचें साल ताम्रपटांत शक १३०९ दिलें आहे तें लक्षांत घेतां, वरील शक १३०८ च्या दानपत्रानंतर एका वर्षानें तो समाधिस्थ झाला, व त्यामुळें तें दान देते वेळीं तो हजर असण्यास कांहीं अडचण नाहीं, हें स्पष्ट होतें. १३०९ पुढें ताम्रपटांत क्षय असें जें संवत्सराचें नांव दिलें आहे, तें चूक असून त्याच्याऐवजीं प्रभव पाहिजे.

८९. Indian Hist. Quarterly, vol. 7, pp. 88-89.

## उद्यां !

( वृत—वसन्त )

उद्यांचें काय सांगावें उद्यांला काय होणार
भिकारी आजचा कां ना उद्याला राव होणार ?
हिरा जो आजचा नामी उद्यां तो कां न भंगेल
जयाच्या आज जूं मानीं उद्यां तो स्वामि होईल.
सुवासें पुष्प डोले जें सुखानें आज बागेंत
उद्यांला तेंच जायाचें मिळूनी हाय ! मातींत.
सुखानें बाळ घोरे जें स्वमातेच्या कुशीमाजीं
विधीनें भाळिं लिहिलें तें कशाला सांगतां आजी ?
सुखाची आजची सरिता उद्यांला शुष्क होणार.
सुखाचें स्वप्न सारें हें उद्यांला फोल होणार.
मनानें बांधले जे जे मनोरे अंतराज्यांत
विरोनी कां न जायाचे उद्यां ते अन्तराळांत !
पुरे ही आजची चिंता, उद्यांचा आणखी घोर
कथोनी भाविकालाचें उद्यांचें चित्र भेसूर !

नीलकण्ठ ( फलटण )



# वृत्तिसंशोधन

[ लेखकः—रा. रा. **गणेश रामकृष्ण हवलदार**, बी. ए., एल्‌एल्. बी. ]

[ आपल्या लाडक्या मुलानें साधल्यास एखादी इंग्रजी परीक्षा द्यावी व नंतर आपल्या आवडीचा धंदा करावा अशी एका धनिक पित्याची इच्छा होती; पण आग्रह नव्हता. त्याप्रमाणें विद्येच्या सुरवातीपासून त्याच्या पसंतीस उतरलेल्या धंद्यांत तो स्थिर होईपर्यंत त्याचें चरित्र या लघुकाव्यांत दिलें आहे.

हा मुलगा सात्त्विक होता. कोणताही धंदा सचोटीनें करुन त्यांत कीर्ति मिळवावी अशी त्याची आकांक्षा होती. त्यामुळें त्याला हवा तो धंदा पटण्यासारखा नव्हता. म्हणून तो एक धंदा सोडून परिस्थितीनें सुचविलेला दुसरा धंदा वक्तृत्वोत्तेजक सभेनें सुचविलेल्या आयत्या वेळच्या विषयाप्रमाणें पत्करीत असे. मनाच्या कांहींशा विलक्षण रचनेमुळें त्याच्या अंगांत अनिश्चितपणा जडला होता. निश्चितपणा होता तो वारंवार धंदे बदलण्यांतच दिसून येत असे. याकरितां एखाद्या धंद्यांत स्थिर होण्यापूर्वी त्याला अनेक धंद्यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें अनुभव घ्यावा लागला. शेवटीं तो शेतीच्या धंद्यांत शिरुन कायम राहिला. तेथपर्यंत त्याच्या तीन ककारांचा—काळ, काय व कांचन यांचा—अक्षम्य व्यय झाला. तशी अवस्था आमच्या तरुण मंडळीची होऊं नये, अशा हेतूनें हें लघुकाव्य त्यांस सादर करीत आहें. ]

सेवोनियां बहुत काळ विनीत पाला ।
होतीस तूं करित कोठवनीं तपाला ॥
द्यायास हे जननि ! जन्म अशा सुताला ।
जो कीर्तिला न वरि कीर्ति वरी न ज्याला!॥१॥

संस्कार सर्व करुनी विधिवत् मुदानें ।
दीनांसही जनक तोषवि अन्नदानें ॥
शुक्लेन्दुवत् मम दिसे जननीस वाढ ।
शेजारणीस कथि येउन 'दृष्ट काढ.' ॥२॥

म्यां चोखिली मुखिं धरून पदांघ्रि बालें ।
हें पाहुनि जननि ! हे ! तव चित्त धालें ॥
"हा बालरूप धरुनी" तुज भास झाला ।
"पत्रस्थित प्रलयकालिक विष्णु आला".॥३॥

कोणी म्हणे 'क्षणिं हंसे उघड्या मनाचा' ।
'सोडी मुठी सहज, बाळ उदार साचा' ॥
'धीमान हा, ठळक रेघ विशाल भालीं' ।
हीं भाकितें शत शतांत खरीं न झालीं. ॥४॥

लागेल चालुं, कधिं बोलुं सुरेख बाळ ।
ही काळजी सरलि राहुनि कांहिं काळ. ॥
अंबा वदे " कधिं कधीं मम जाय धीर ।
हें फूल—यद्यपि फुले—करितें उशीर". ॥५॥

तें न्हाण माखण व जेवण योग्य कालीं ।
लाधोनियां मज निरामय झोंप आली ॥
या एक कारण सदोदित जागजागीं ।
होती सुजाण सुतवत्सल माय जागी. ॥६॥

हें मातृदैवत जुनेंच नव्हे नवीन ।
त्याच्या पदीं सतत मी शिर वांकवीन. ॥
काव्यांत मातृविषयस्तव ऐकवी न ।
काल प्रसंग बघुनी तर तो कवी न. ॥७॥

जाल्या सदैव रुचतें लिहिणें पित्यास ।
स्पर्शी उताविळपणा न तथापि त्यास. ॥
वर्षें मदीय सरलीं रमण्यांत आठी !
"शाळेंत जा" म्हणत तो चढवोनि आंठी॥८॥

"खेळांतही करिं दिली न कधींच पाटी ।
पाहूं कसा न शिकशी मिळतां चपाटी".॥
आला मुहूर्त विजयादशमी मराठी ।
शाळेंत धाडि मज तात धरून पाठी.॥९॥



वर्णील कोण सुख तेथिल जो न चाखी ?।
राखी मुलां गुरु गुरांस जसा गुराखी ! ।।
ग्राम्योपमान जरि हें गुरुच्या न जोगें ।
लाधे तयास शिशुंच्या सहवासयोगें. ।।१०।।

त्याचा अलंकृत परी महिमा विलोकीं ।
कीं शिष्य-शेत, पिकवी गुरुमेघ लोकीं. ।।
फेडावयास गुरुचे उपकार पाहीं ।
नाहीं उपाय नमनाविण अन्य कांहीं. ।।११।।

माझी विचित्र परि भूरचना मनाची ।
पोषी न धान्यफल ती बटु वामनाची. ।।
मोठेपणास दुरुनीच कसा बुझालों ।
मी बुद्धिकूप असुनी लवणांबु झालों ! ।।१२।।

ठेवोनियां सहज बुद्धिवरीच भिस्त ।
सारून बाजुस परिश्रम आणि शिस्त ।।
केले धडे पुढतिं पाठ सपाट मागें ।
तेणें अनुक्रम मुलांत न नीट लागे. ।।१३।।

तें पारितोषिक कधीं मजला न लाधे ।
ती शिष्यवृत्ति तशि लाभकरी न बाधे. ।।
स्पर्शी कुठें कमर वा चवड्यास न्हाणी ।
सारें मिळून गुडघाभर खोल पाणी ! ।।१४।।

अन्या वरिष्ठ ठरण्या मज मध्यमाचा ।
झाला वराच उपयोग म्हणावयाचा ।।
किंवा खरा दुरुपयोग म्हणा वयाचा ।
तैसा श्रमाधिक अनल्प धनव्ययाचा. ।।१५।।

विद्येंत जी दिसलि आज सरासरी ती ।
वाटे दिसेल इतरत्रहि तीच रीती. ।।
कैसा निघेल दिन हें सुचवी प्रभात ।
शीतावरून जन ओळखतात भात. ।। १६ ।।

होता जुना सदय पैतृक एक मित्र ।
माझी अशी स्थिति तया गमलो विचित्र ।।
बोले " उगीच करितोस मुला अनास्था ।
एकाक्षिहीन घरची तव वित्तसंस्था ।। १७ ।।

विद्या विभूषण अमोल महाधनांचें ।
विद्या अलंघ्य बल त्या दुबळ्या जनांचें ।।
विद्यांकुशास वश वारण इंद्रियांचे ।
विद्याभिवृद्ध जनवृद्ध न ते वयाचे. ।। १८ ।।

'झाली' कुणी, कुणि म्हणे 'अवकाश आहे' ।
हीं उत्तरें मिळुनि जो फिरताच राहे ।।
अभ्यास तोषकर माधुकरी करी तो ।
तैसा न कां धनिकपुत्र अहो करीतो ! ।।१९।।

लावून वार मिळवून सदैव माफी ।
घेतां पिण्या निशिदिनीं न चहा न काफी ।।
अभ्यास उत्तम करी असला गरीब ।
तैसा न कां धनिकपुत्र अहो ! नशीब! ।। २० ।।

हे शब्द चित्तिं रुतले जणुं तीक्ष्ण भाले ।
झालें सुरेख तितक्यावरतीं निभालें ।।
केलें कबूल "त्यजुनी प्रियतेहि खेळ ।
लावीन अध्ययनिं नेमून सर्व वेळ". ।। २१ ।।

मी आपुलें वचन आदरपूर्व पाळीं ।
वाचोनियां सतत शूल उठे कपाळीं ।।
तत्रापि जाग्रण करीं. मग काय झालें ?।
दृष्टीस आणि जठराग्निस मांद्य आलें. ।।२२।।

चिंता मनीं प्रकृतिची कधिं केलि नाहीं ।
वर्गांत आद्यपदलाभ मिळे सदाही ।।
माता, पिता, गुरु, सखे मजला चहाती ।
आलें तयां गमत बुद्धिनिधान हातीं. ।। २३ ।।

विद्येच्या पथिं मी सवेग गतिही स्थैर्यें पुढें राखिली।
'मातृक्लेशविनाशिनी भगवती माई परीक्षा दिली ।।
आनंदांत जयोत्सवें बहुपरी ही पर्वणी गाजली ।
घोडें येइ घरास सर्व म्हणती न्हाऊन गंगाजलीं*. ।।२४।।

---

* येथें देउनि एक टीप कथितों माझ्या हिताच्या गुजा ।
दोहोंच्या-रचलें म्हणोनि वहिलें-त्या चार केल्या भुजा ।।






अनुक्रमणिका

सांगे तात "नसे अवश्य शिकणें याच्यापुढें बा ! तुला ।
विद्येचा बहुमानदर्शक टिळा लागे कपाळीं मुला ॥
अभ्यासें तनु भागली करिं पुन्हा विश्रान्तिनें ती बरी ।
धंदा आवडिचा सुखें मग बघें बाहेर किंवा घरीं !" ॥ २५ ॥

धंदा स्वतां निवडणें रुचलें मनाला ।
जैसा स्वयंवरविधि प्रमदाजनांला ॥
आतां म्हणून ठरलें शिकणें पुढेंच ।
दैवें परन्तु मज लागलि शीघ्र ठेंच. ॥ २६ ॥

होतें जरी प्रकृतिचें न दुरुस्त घोडें ।
मी लागलों तरिहि दामटण्या न थोडें ॥
केला विशेष सुरु औषधिरूप घास ।
उद्दिष्ट भूस मज नेइल हीच आस. ॥ २७ ॥

एके दिनीं भरुनि औषध मी कुपींत ।
विद्यालया चलतसें पथिं पीत पीत ॥
कोणी वदे बघुनि शुष्क विवर्ण काया ।
"घाई कशास करितोस मुला शिकाया ! ॥२८॥

विद्याबलान्वित मना बसण्यास गेह ।
तो उक्त एकचि असे बलवन्त देह ॥
मेंदूस देइ बल पुष्टि बदाम गीर ।
तोही वसे कठिण गेहिं सदैव वीर. ॥२९॥

आतां अशाच परतून मुला घरा जा ।
होशील तूं पुढति ठाउक थोर राजा. " ॥
हे बोल सर्व शिरले हृदयांत खोल ।
वायां ठरे न डुलणें, नच फोल बोल ॥३०॥

होता न पंडित जरी सुत अंजनीचा ।
पावे बली म्हणुन देवपणा जनींचा ॥
शक्तीशिवाय नुसतें शव हें शरीर ।
हें तत्त्व मी उमगलों घडुनी उशीर. ॥३१॥

माझी विचारगति फार दिसे त्वरेची ।
केव्हां कृतींत उतरे न कळे खरेंची ॥
तारूं दिशा बदलुनी परि हांकराया ।
अभ्यास सोडुनि दिला न पुन्हा कराया! ॥३२॥

व्यायाम मंदिरिं दुजा दिवशीं प्रवेश ।
म्यां घेतला करुनि भीति मनीं न लेश ॥
व्याघ्रा करीं धरुनि जेरिस मल्ल आणी ॥
हें भीतिचित्र सुकवी न मुखस्थ पाणी. ॥३३॥

"काडी" पदास जुळुनी पद "पेलवान" ।
झाल्या पदें मज तिथें गुरु देति मान. ॥
निंदा करी स्तुतिमुखें जर वैद्यराज ।
आशावलंबनचि रुग्णजनां इलाज. ॥३४॥

केलें तिथें प्रथम पूजन मारुतीचें ।
सन्मानकृत्य गुरुचें मग जें रितीचें. ॥
अंगावरी लढवुनी गुरु देइ पाठ ।
लावी क्षणांत जमिनीस मदीय पाठ. ॥३५॥

काढीतसें कितिक जोर करून जोडी ।
आली तयें बळकटी मजला न थोडी. ॥
वर्णू कसें सुख खरेंच उठाबशांचें ? ।
तें काम नाहिं कथितों नुसत्या बश्यांचें. ॥३६॥

मारीं उडी पळत उंच तशीच लांब ।
झाला मला विपुल ठाउक मल्लखांब ॥
सेवोनियां पय सशर्कर आणि साय ।
झाला जरा दृढ जरा मउ तेविं काय. ॥३७॥

झालों स्वतांच्यावर मी प्रसन्न ।
व्यायाम मातें पुरवील अन्न ।
करून उस्ताद म्हणून धंदा ।
लोकांस लावूं बलभीमनादा ॥३८॥

---

भार्या तातकृता मला प्रिय सदा आहे गुणांनीं तशी ।
संसारक्षम ती कलांत कुसरी नांदे घरीं नीटशी ॥ १ ॥




अनुक्रमणिका

व्यायाम अल्प परि गर्व अनल्प साचा ।
अंगांत तो मुरुन जाय बहू दिसांचा ।
त्याचा समग्र परिहार करावयाला ।
येथें दुरून जयमल्ल सशिष्य आला. ॥३९॥

कोणी मुठींत तिळ दाबुनि तैल काढी ।
इक्षू करें पिळूनियां रस कोणि वाढी ॥
येईल जो न उचलूं इतरांस हातीं ।
हांडा कुणी उचलि तोच धरून दांतीं ॥४०॥

बुक्क्यासवें सहज नारळ कोणि फोडी ।
ताणून अन्य कुणि सांखळदंड तोडी ॥
मानेवरी धरुन वांकवुनी पहार ।
आणील हा कुणि म्हणे सकलांस हार ॥४१॥

रेडा पुढें पळत पाठिस मल्ल लागे ।
ओढी तया धरुन पुच्छ तसाच मागें ॥
पाडा करें उचलि पाय कुणी धरून ।
मागें सलील मग फेंकि शिरावरून. ॥४२॥

चड्डी पिनद्ध चढवून कसून कांचा ।
बोले कुणी उठुन ' मी नच वीर काचा ॥
एका दमांत कुणि पांच हजार जोर ।
काढूं शकेल तर येउ इथें समोर !' ॥४३॥

झालें पुढें चुरस लागुन मल्लयुद्ध ।
होती न त्यांत परि पद्धत शास्त्रशुद्ध ॥
घालूं तिथें बघति ते भलतेच पेंच ।
"हो ! हो !" म्हणून अडवीत उठून पंच.॥४४॥

वैरास आरंभ परस्परांनीं ।
केला वृषांनीं जणुं वन्य रानीं ॥
"झालों जयी" एक करी बहाणा ।
म्हणे दुजा "वा ! दिसशी शहाणा"॥४५॥

चिढून सांगे " न बघाच हाणा ।
मीं पाडिला भूवरि या उताणा" ! ॥
झाले पृथक् पक्ष तिथेंच दोन ।
त्रयस्थ गेले तिथुनी पळोन. ॥४६॥

बाहूबाहवि युद्ध राजपुरुषें येवोनियां मोडिलें ।
कांहींतें धरुनी अवश्य म्हणुनी कारागृहीं कोंडिलें ॥
त्यापूर्वी फुटलीं शिरें व तुटलीं अंगें किती त्यांप्रती !
लांगूलावर वांचले सुभग त्यां नाहीं मिती संप्रति !॥४७॥

अशा व्यायामाचा मुळींच मज धंदा न करणें ।
जयाच्या पायीं हीं उगिच पडती घातक रणें ॥
मनुष्यांमाजी ही कुठुनि शिरली वृत्ति पशुंची ।
तिच्या लोपें यांचें मन कथिं कधीं होइल शुची ?॥४८॥

पुंगीचा स्वर ऐकुनी सविषही डोले फडया नाग तो ।
हस्ती मत्त मृदंगशब्द पडतां कर्णीं ऋजू वागतो ॥
देती टाकुनि जातिवैर मुरलीनादें पशू जंगली ।
गानें गोड मनुष्यसंतति सुखें नांदो जगीं चांगली. ॥४९॥

शक्तिप्रयोग लखलाभ असोत मल्ला ।
गाण्यांत पाहुं जर जाइल दूर पल्ला ॥
संगीतविज्ञ गुरुसन्निध रोज गावें ।
शान्तिप्रवर्तक म्हणून सुखें जगावें. ॥५०॥

कार्यास या मिळविला लहरी बुवा मी ।
जोडी प्रशस्त गुरुशिष्य हरीबुवा मी. ॥
कोणी प्रियंवद वदे "मम थोर पुण्य ।
दोघांत कीं दिसतसे बहु आनुगुण्य." ॥५१॥

केले परिश्रम मदर्थ जरा बुवांनीं ।
साधें व शुद्ध मम गायन सर्व वानी. ॥
गानोत्सवास पुरिं गायक पुंगवांनीं ।
आम्हां निमंत्रण दिलें बहु आर्जवांनीं. ॥५२॥

आले अमीर उमराव इनामदार ।
श्रीमंत थोर सरदार व नामदार ॥
आचार्य पंडित व खां व बुवा वरेच ।
पाहूनि ज्यांस नव होतिल घाबरेच ॥ ५३ ॥

गंधर्व दीढ दुसरे पुरते अडीच ।
येतां न वाव उरला इतरांस टीच. ॥
कोणी उभे रसिक मानिति भाग्य मोठें ।
झाली न मैफल अशी अगदींच कोठें ॥५४॥

( अपूर्ण )




अनुक्रमणिका